# विवाहसंस्कार



लेखक

विद्यानिधि

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

---

मुद्रक व प्रकाशक

**शंकर रामचंद्र दाते**

'लोकसंग्रह' छापखाना पुणें, पेठ बुधवार घ. नं. २७.

---

किंमत १२ आणे.

# विवाहाचा उद्देश.

प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् । ऋग्वेद.

विवाहाचा उद्देश उपभोग नसून प्रजा सर्वांगपरिपूर्ण निर्माण करणें हा आहे. गोत्र, प्रवर, वयोमर्यादा, संस्कार, घटित, सवर्णता वगैरे पहाण्याचा हेतु एकच आहे कीं, परस्पराला अनुकूल असणाऱ्या वधूवरांचा समागम व्हावा आणि आईबापापेक्षांहि सरस प्रजा निर्माण व्हावी. संततीचे गुणदोष, रोगी निरोगीपणा, हे बहुवंशी आईबापांवर अवलंबून असतात. म्हणून विवाहसंस्काराचें महत्त्व सर्व दृष्टया अत्यंत मानण्यांत येतें. वधूवरांची निवड करण्यांतहि ज्या आडकाठ्या निर्माण करण्यांत आल्या आहेत त्याहि याच मुद्यावर होत. याकरतां विवाहाच्या मूळ उद्दिष्टाकडे सर्वांचें लक्ष वेधणें अत्यंत अवश्य आहे. स्त्री हें उपभोगाचें साधन आहे, करतां तिच्या सुरूपतेपेक्षां जास्त कोणत्याहि इतर गोष्टींकडे लक्ष देण्याची आवश्यकता नाहीं हें धोरण टाकाऊ आणि समाजविघातक आहे. आनुवंशिक असणारे रूप, गुण व रोग हे तीन तीन पिढ्यानंतरहि उदय पावतात हें प्रत्यक्ष अनुभवास येतें. तसेंच समान कुलांत किंवा जवळच्या कुलांत संबंध होत राहिल्यास वंशक्षय होतो हेंही तितकेंच प्रसिद्ध आहे. म्हणून शक्य त्याप्रमाणें वधूवरांची निवड योग्य प्रकारें झाली पाहिजे. त्यांचीं कुलें, जात, वयोमर्यादा आणि परस्परानुकूलता हीं पहाणें जरूर आहे. इतकेंच नव्हे तर अशी निवड होऊन विवाह झाला तरच तो शास्त्र विवाह झाला असें होईल. अयोग्य विवाह होऊन संततिनाश, रोगी संतति, अल्पायुषी संतति किंवा स्वभावभिन्नतेमुळें वधूवरांचें पटनासें झालें तर त्यांना पार देणारे किंवा कन्यादानाचें पुण्य घेणारे लोक त्या पापाचे भागीदार होतात हें ध्यानांत धरावें.

## वधूवरांची वयोमर्यादा

वैद्यशास्त्राप्रमाणें सोळा वर्षांची स्त्री आणि वीस वर्षांचा पुरुष हे संभोगाला योग्य आहेत. मूल होण्याच्या सुमाराला पुरुषाचें वय पंचविशीच्या सुमारास

असावें आणि स्त्रीचें वय विसाच्या सुमारास असावें असें आहे. त्यावरून साधारणपणें वधूवरांच्या संभोगकालाची कल्पना येईल. पण विवाहाची वयोमर्यादा पहाण्याकरितां आपणास गृह्यसूत्राकडे वळलें पाहिजे. आश्वलायन, सत्याषाढ, पारस्कर आणि गोभिल या चारहि गृह्यसूत्रांवरून वधू संभोगक्षम झाल्यावर विवाह करावा असेंच दिसून येतें. शेवटल्या तीन सूत्रांत तर लग्नांत चतुर्थीकर्म सांगितलें आहे. आणि गोभिल गृह्यसूत्रांत लग्नानंतर संभोगापूर्वी वधूस पुनः रजोदर्शन होण्याची आवश्यकता आहे कीं नाहीं याबद्दलहि मतभेद व्यक्त केला आहे. यावरून विवाहकालासंबंधींहि निश्चित मत ठरवितां येण्यासारखें आहे.

गोभिलगृह्यसूत्रांत वधू किती वयाची असावी त्याबद्दल खालील सूत्र आहे.

अनग्निका तु श्रेष्ठा । प्रपा० ३ खंड ४. सूत्र ६

नग्निका म्हणजे जिला लज्जादि स्त्रीधर्म उत्पन्न झाले नाहींत, नग्न स्थितींतहि जीं मोकळेपणानें हिंडू फिरूं शकते ती. याच्या उलट तारुण्य प्राप्त झालेली ती ' अनग्निका ' होय. यावरून ऋतु प्राप्त झालेली तरुण स्त्री विवाहयोग्य होय. म्हणून मनूनेंहि म्हटलें आहे.

देवदत्तां पतिर्भार्यां विन्दते नेच्छयात्मनः ।

मनुस्मृति. ९. ९५

## चतुर्थीकर्म

गोभिल गृह्यसूत्रांत चतुर्थीकर्माचा उल्लेख स्पष्ट केला आहे. तेथें मतभेद फक्त संभोगापूर्वी पुनः ऋतुमती होण्याची आवश्यकता आहे कीं नाहीं याविषयीं आहे. कांहींच्या मतें विवाहानंतर पुनः ऋतुमती होण्याची आवश्यकता नाहीं. गोभिलाचार्यांचे मत मात्र ऋतुमती झाल्यावर संभोग करावा असें आहे. तेथें असें म्हटलें आहे—

उर्ध्वं त्रिरात्रात् संभव इत्येके, यदर्तुमती भवत्युपरतशोणिता तदा संभवकालः । ( प्रपा. २. खंड. ५. ७–८ )

पारस्कर गृह्यसूत्र, सत्याषाढगृह्यसूत्र यांमध्येंहि असेंच म्हटलें आहे.

स्मृतिग्रंथांत विवाहाची मर्यादा याच्या अलीकडे ओढली असून रजोदर्शन

विवाहापूर्वी बापाच्या घरीं होणें हा मोठा दोष मानला आहे. म्हणजे विवाह रजोदर्शनापूर्वी होणेंच इष्ट धरलें आहे. आणि आपल्या समाजाचा सामान्यतः तिकडेच ओढा आहे.

रजोदर्शनानंतर मुलींचे विवाह करावयाचे म्हटल्यास कानीनादि संतति समाजांत होणें अपरिहार्य आहे. ही आपत्ति टाळण्याकरितां समाजानें बालविवाह संमत केला. पण विधवांची संख्या समाजांत बेसुमार वाढूं लागली व एकत्र कुटुंबपद्धति जशी नष्ट होत चालली तशी जबाबदारी अंगावर घेण्याची पात्रता आल्याशिवाय विवाह न करण्याकडे समाजाची प्रवृत्ति वाढूं लागली आहे. तथापि एवढें निश्चित म्हणतां येईल कीं बालविवाहांत कांहीं महत्त्वाचे गुण आहेत आणि त्याला आपला समाज अंतरतो आहे. बालविवाह होऊनहि अकालीं संभोग टाळतां येईल तर बालविवाहाचे बरेच दुष्परिणाम नष्ट होण्याचा संभव आहे. पण एकत्र कुटुंबपध्दति मोडल्यामुळें मुलींचें शिक्षण व शारीरिक वाढ व्यवस्थेशीर होणें अशक्य असल्यामुळें बालविवाहाच्या फाय-द्यांस आपणास मुकावें लागत आहे.परंतु प्रौढविवाहानें उत्पन्न होणाऱ्या आपत्ति निस्तरण्याला समाजानें आतां आपलें मन घट्ट करावयास हवें ! पूर्वीच्या काळीं प्रौढ विवाह चालू होता यांत बिलकूल शंका नाहीं. पण त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणीस तोंड देण्यास लागणारें औदार्य किंवा प्रांजलपणा त्यांच्यांत होता तो आपणासहि आतां संपादन केला पाहिजे. विवाहापूर्वी कन्येच्या प्रौढ-पणामुळें समाजांत जे दोष उत्पन्न होतात त्यांच्या निवारणार्थ मुलींचा पोशाख, राहणी, आचार, व्यवहार, शिक्षण या सर्वच गोष्टींत लक्ष घालून क्रांति करा-वयास हवी. तसेंच पुरुष विद्यार्थ्यांच्याविषयींही व्हावयास पाहिजे. तसा प्रयत्न न झाल्यास हें एक सामाजिक संकट उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

शिवाय प्रौढ विवाहाच्या बाबतींत दुसऱ्या आपत्ति अनिवार्य होऊन बसतात. प्रौढविवाह म्हणजे कन्या किती वयाची झाल्यावर तिचा विवाह करावा ? आणि कन्या वयांत आल्यानंतर तिच्यावर पालकाची सत्ता तरी कित-पत चालणार? कन्येच्या आकांक्षा वाढलेल्या असल्यावर तिच्या आकांक्षास पुरें पडणारा पति न मिळाल्यास तिची स्वाभाविक अविवाहित राहण्याकडे प्रवृत्ति होणार. सारांश प्रौढविवाहाला मर्यादा राहाणार नाहीं. स्वयंवर होऊं लागेल

आणि योग्य पति न मिळाल्यानें ब्रह्मचर्य पाळणाऱ्या वृध्दकुमारी समाजांत वाढतील. साधारण खाऊन पिऊन सुखी असणाऱ्या गरीबांचीं लग्नें होणार नाहांत आणि श्रीमंतांच्या मागें अनेक कुमारिका लागतील. मिश्रविवाह व्हावयास लागतील आणि हजारों वर्षांपासून सांभाळलेली जातिसंस्था नष्ट होईल. याला तोंड देण्याची व्यवस्था केल्याशिवाय प्रौढविवाहाला संमति देणें आततायीपणाचें होईल.

जातीच्या जन्मजात समानतेविषयीं जरी मतभेद नसला तरी जाति अभंग टिकलीच पाहिजे याविषयीं मतभेद असणार नाहीं. निदान ब्राम्हणांनीं तरी ह्याविषयीं निष्ठुर असलें पाहिजे. सर्व सुधारणा कबूल, पण ब्राह्मणाची जाति नष्ट करण्याचा प्रयत्न म्हणजे ब्राह्मणांच्या घरांत इतरांच्या मुली आणि इतरांच्या घरांत ब्राह्मणांच्या मुली असें करण्याचा प्रयत्न जर कोणी करील तर त्याची ब्राह्मणजात गय करणार नाहीं. हिंदूंतील अशी चळवळ करण्याऱ्या लोकांना रक्ताची तहान लागलेली आहे असें म्हणावें लागेल आणि ब्राह्मणांकडून ती तहान बरोबर भागविली जाईल याबद्दल कोणीहि मनांत शंका बाळगूं नये. ब्राह्मणांची ही वंशसंरक्षणाची तत्परता अत्यंत फलदायी झाली असून त्याचा इष्ट तो परिणाम ब्राह्मण जातीवर स्पष्ट दिसत आहे. अशा स्थितींत कोणता महामूढ ब्राह्मण आपली जात नष्ट करण्यास तयार होईल?

## आठ प्रकारचे विवाह.

१. ब्राह्म, २ दैव, ३ प्राजापत्य, ४ आर्ष, ५ गंधर्व, ६ आसुर, ७ पैशाच, ८ राक्षस. हे आठ प्रकारचे विवाह होत. त्यांची योग्यता अनुक्रमें कमी कमी आहे. यापकीं पहिले चार सर्व वर्णांस उक्त आहेत व पुढील गंधर्वादि चार निंद्य असा सर्वसाधारण नियम आहे. वरील विवाहांचीं लक्षणें पुढीलप्रमाणें आहेत.

१. **ब्राह्मविवाह**–वराला आपल्या घरीं बोलावून वस्त्रालंकारांनीं भूषित कन्या विधिपूर्वक देणें.

२. **दैवविवाह**–यजमानानें आपल्या ऋत्विजाला यथाशक्ति अलंकृत करून कन्या देणें.

३. प्राजापत्यविवाह्–परस्परांनीं एकमेकाला अनुकूल वागून धर्मानें रहावें अशा बोलीनें कन्या देणें.

४. आर्षविवाह्–वरापासून एक गायबैल घेऊन त्यास कन्या देणें.

५. गांधर्वविवाह–स्त्रीपुरुषांची एकमेकांवर प्रीति जडून पतिपत्नीधर्मानें आजन्म राहण्याचें ठरविणें.

६. आसुरविवाह—कन्येच्या पित्याला तो मागेल तितका पैसा देऊन कन्या वरणें.

७ पैशाचविवाह–कन्येचे पालक निद्रित असतां किंवा असावध असतां कन्येस चोरून तिच्याबरोबर विवाह करणें.

८. राक्षसविवाह—कन्येच्या पालकासमक्ष कन्या नेणें व नेत असतां कोणी प्रतिबंध केला तर त्याच्याशीं प्रसंग पडल्यास हाणमारहि करून कन्येचे आप्त व ती कन्याहि रडत असतां तिला नेऊन तिच्याशीं विवाह करणें.

( आश्व. गृ. १–६ )

यांतील पहिले सहा ब्राह्मणांस उक्त आहेत; त्यांतही पहिले चार अधिक श्रेष्ठ होत. क्षत्रियांस गंधर्वादि पुढचे चार उक्त आहेत, त्यांतहि राक्षस श्रेष्ठ. वैश्यांस व शूद्रांस गांधर्व, आसुर आणि पैशाच हे तीन उक्त आहेत, त्यांत आसुर श्रेष्ठ होय. ( मनुस्मृ. अ. ३. २३–२४ ).
ह्या विवाहामुळें अनुक्रमें हीन हीन प्रजा होते म्हणून ते विवाह कमी कमी प्रतीचे होत असें बौधायनगृह्यसूत्रांत व इतरत्रहि लिहिलें आहे.

## सूत्रोक्त विवाह.

विवाहहोम व गृहप्रवेशनीयहोम हे दोनच विधि सूत्रकारानें सांगितले आहेत. विवाहहोमांत होम पाणिग्रहण, लाजाहोम, अग्निप्रदक्षिणा, अश्मारोहण, सप्तपदी आणि ध्रुवादिदर्शन इतके विधि येतात; आणि गृहप्रवेशनीयांत गृहप्रवेश, होम, वधूला उपदेश आणि देवतेची प्रार्थना इतके विधि येतात. हे केल्यानें विवाहाचे सर्व उद्देश संपूर्ण होतात. हें त्या विधींतील कृत्यांवरून आणि मंत्रावरून स्पष्ट ध्यानांत येईल. कोणत्याहि शाखेच्या सूत्रांत ह्याच विधींना प्राधान्य दिलेलें आहे.

## वाङ्‌निश्चय

वाङ्‌निश्चय किंवा वाग्दान करण्याचा विधि सूत्रांत नाहीं. तथापि व्यवहारदृष्ट्या या विधीचें अत्यंत महत्त्व आहे. परस्परांच्या गोत्रादिकांचा तेथें स्पष्ट उल्लेख केला जातो. कन्येची चांगल्या प्रकारें पहाणी केली जाते. परस्परांच्या आप्तेष्टदेखत परस्परांचीं बोलणीं झाल्यामुळें पुढें उत्पन्न होणाऱ्या हरकती नष्ट होतात. करतां हा विधि सूत्रांत नसला तरी व्यवहारदृष्ट्या आणि शिस्तीच्या दृष्टीनें करावयास हवा. तसा त्याचा उल्लेखहि विवाहसूक्तांत ( सत्येनो० ) सांपडतो. पूर्वकालीं विवाहापूर्वी बरेंच आधीं वाग्दान करीत असत. अशा वाग्दानोत्तर वधूनें उभय कुलांतील आशौच धरावें असें सांगितलें आहे, त्यावरून दिसतें. मारवाडी लोकांत ही चाल सध्यांहि आपणांस दिसते.

## सीमान्तपूजन.

हा विधिहि लौकिक आहे. तथापि वराच्या पहाणीच्या दृष्टीनें हा विधि अत्यंत महत्त्वाचा आहे. स्वजातीय, विजातीय अशा सर्व प्रकारच्या लोकांचा विवाहांत समावेश करण्याला हे समारंभ उपयोगी पडतात. ग्रामसंस्था आणि तिचें संघटन या दृष्टीनें हे समारंभ उत्पन्न झाले आहेत. खरोखर जेथें आवश्यकता नसेल तेथें हा समारंभ करण्याची कांहींच जरूर नाहीं.

## मधुपर्क.

सध्या विवाहांत मधुपर्क करतात. परंतु सूत्रकारानें तो विवाहांत सांगितला नाहीं. आश्वलायन गृह्यसूत्रांत ( १. २४ ) यज्ञप्रकरणांत हा मधुपर्क विधि सांगितला आहे. मधुपर्क विधीचें शेवटलें सूत्र ' नामांसो मधुपर्को भवति । ' मांसाशिवाय मधुपर्क होत नाहीं ' असें आहे. हा आतिथ्य विधि आहे. आप्त, शिष्ट व श्रेष्ठ लोक घरीं आले असतां त्यांच्या आतिथ्यार्थ मधुपर्क करावा लागे. अशा मानकरी लोकांना अर्घ्य असें सूत्रकारांनीं म्हटलें आहे. त्यांची यादी स्नातक, राजा, आचार्य, सासरा, चुलता किंवा मामा अशी आश्वलायनसूत्रांत दिली आहे. कात्यायन सूत्रांत ' षडर्घ्या भवन्ति । ऋत्विग् वैवाह्यः, राजा, प्रियः, स्नातकः ' असे सहा दिले आहेत. यांत विवाहांत व कोणीहि प्रिय माणसाच्या सन्मानाकरतां मधुपर्क करावयास सांगितला आहे. प्रथम गोमांसानें मधुपर्क करीत असत. परंत पुढें गोहत्या बंद होऊन गाय

दान करण्याचा प्रचार सुरू झाला. पण. मांसाशन बंद झालें नाहीं. संस्कार कौस्तुभांत ' गोप्रतिनिधित्वेन छाग आलभ्यते ' असें म्हटलें आहे. यावरूच पुढें गाईच्या ऐवजीं बकऱ्याची योजना झाली. गांवचे हिशेबी पूर्वी भेट बकरा म्हणून व्ययाची बाब आढळून येते. राज्याधिकारी किंवा शिष्ट गांवांत आले असतां त्यांचे सन्मानार्थ होणाऱ्या खर्चासाठीं हें सदर असे. हल्ली लग्नांत विहिणीस ' भेट बकरा ' म्हणून एक रुपया देण्याची पद्धत आहे असो मधुपर्कांतील गोमांस किंवा अजमांस बंद होऊन त्या ऐवजीं दही, मध वगैरे पदार्थ आले. आतां चहा देऊन आतिथ्य करण्याची चाल पडली आहे. चहानें मधुपर्काची पूर्तता कोणी केल्यास त्यास दोष देण्याचें कारण नाहीं उलट ते देशाचारास धरून होईल. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे हा एक सन्मानाचा प्रकार आहे.

## कन्यादान

विवाह संस्कारांत सूत्रकारानें कन्यादान सांगितलें नाहीं. तथापि ब्राह्म, दैव, आर्ष आणि प्राजापत्य अशा चार विवाहांत कन्यादान करावें असें सूत्रांत त्या त्या विवाहांचीं लक्षणें सांगतांना सांगितलें आहे. शक्य तों कन्यादान टाळण्याचा प्रसंग येऊं नये. कन्यादानाचा विधि वाचला असतां कन्यादानांत किती उच्च भावना गोविली आहे हें आपल्या ध्यानांत येईल. समाजहिताच्या दृष्टीनें कन्यादान करून तिला संसाराला लावणें अत्यंत अवश्य कर्तव्य आहे. म्हणून कन्यादानाचें महत्त्व समाजांत स्त्रीपुरुषांच्या मनांत बिंबविलें पाहिजे. जुन्या लोकांच्या अन्तःकरणांत कन्यादानाबद्दल आदराची भावना विशेष असते. ती नव्यांत कमी होत असेल तर तें समाजस्थैर्याच्या दृष्टीनें अनिष्ट आहे. त्याबरोबर ' देशे काले च पात्रे च कन्यादान झालें पाहिजे.तरच त्याचा उपयोग. योग्यस्थलीं कन्यादान होऊन तिला चांगली प्रजा निर्माण झाली म्हणजे कन्यादानाची सांगता झाली असें मानण्यांत येते.

मुलीचा पैसा घेणारे किंवा हुंडा घेणारे हे नरमांसविक्रय करणारेच होत.

## अक्षतारोपण.

हा विधिहि सूत्रांत नाहीं. परंतु त्या विधींत परस्परांच्या ज्या भावना व्यक्त केल्या आहेत त्या अत्यंत महत्त्वाच्या असून वधूवरांनीं आपल्या भावी

आयुष्याची रूपरेखाच त्यांत आखली असें दिसतें. उपभोग, त्याग, संपत्ति, धर्म, संतति, कीर्ति अशा क्रमानें वधूवरांनीं आपल्या इच्छा पूर्ण होण्याविषयीं भावना व्यक्त केली आहे ती अयोग्य असें कोण म्हणेल ? विवाहकालीं समजून उमजून जर या भावना व्यक्त केल्या जातील तर त्यांचा किती तरी चांगला परिणाम होईल !

## विवाहहोम.

हा विधि सूत्रकारानें सांगितला आहे. यांत होम पाणिग्रहण, लाजहोम, अग्निप्रदक्षिणा, अश्मारोहण, सप्तपदी हे अत्यंत महत्त्वाचे भाग आहेत. त्यांतील मंत्रही परस्परांच्या भावना व्यक्त करणारे असून वधूवरांना समजून घेण्यासारखे आहेत. व प्रत्येक कर्म वधूवरांत सलोखा वाढविणारें असून त्यांना वळण लावणारें आहे.

## ध्रुव, अरुंधती, व सप्तर्षींचें दर्शन.

सप्तपदी झाल्यावर रात्रीं व रात्र नसल्यास, रात्र झाल्यावर वधूवरांनीं बाहेर उघड्यावर येऊन ध्रुव, अरुंधती व सप्तर्षि यांचें दर्शन घ्यावें. त्यावेळीं खालील वाक्य वधूनें म्हणावें.' जीवपत्नी प्रजां विन्देय '( ७० ) म्हणजे माझा पति सदा जिवंत राहून मला संतति प्राप्त होवो. विवाहहोमाजवळ गेल्यापासून सप्तर्षींचें दर्शन होईपर्यंत वधूनें मूक राहावें असा नियम आहे.

तुम्ही ध्रुवासारखे अढळ व्हा. अरुंधती ही स्त्रियांची आदर्श आणि सप्तर्षि आपले पूर्वज म्हणून त्यांचें दर्शन घेऊन त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय करणें असा ह्या विधीचा उद्देश दिसतो आणि त्याचें महत्त्वहि अत्यंत मानण्यांत येते.

## गृहप्रवेशनीय होम.

हा होम वरानें वधूसह आपल्या घरीं आल्यावरच करावयाचा असतो, कारण, त्याचें नांव गृहप्रवेशनीय–गृहप्रवेशानंतर करावयाचा–असें आहे. परंतु विवाहहोम झाल्यावर त्याच वेळीं त्याच अग्नीवर पुरोहित लोक गृहप्रवेशनीय होम करवितात आणि कोणी तर विवाहहोमाच्या प्रधानाहुतीच्या बरोबरच गृहप्रवेशनीय प्रधानाहुति देतात, आणि इतर सर्व विधि सोडून देतात.

ही चालहि प्रयोगरत्नकार नारायणभट्टापासून दिसते. ते म्हणतात,

' शिष्टास्तु श्वशुरगृहे एव कुर्वन्ति' वास्तविक हा चुकीचा आचार आहे. गृहप्रवेशनीयाचा संकल्प व इतिकृत्यता या सर्वांच्या हें अत्यंत विरुध्द आहे. व ' विवाहाग्निमग्रतोऽजस्त्रं नयंति । आ. गृ. १ विवाह झाल्यावर घरीं जातांना तो आपल्याबरोबर आपल्यापुढें चालवावा अशी सूत्रकाराची आज्ञा, तिच्या हें सपशेल विरुध्द आहे.

पण प्रेताच्या पुढें अग्नि नेतात त्याप्रमाणें वरातीच्या पुढें अग्नि नेणं प्रशस्त न वाटल्यावरून सध्यांची चाल नारायणभट्टाच्या पूर्वीपासून प्रचलित झाली. पण त्यापेक्षां मुख्य कारण गृह्याग्नि कायम ठेवण्याची कल्पनाच लोकांतून नष्ट झाली, व त्यामुळें एकदां कोठें तरी ठरीव विधि उरकला कीं विवाहविधि झाला ही समजूत यजमान व भिक्षुक यांच्या मनांत बद्धमूल झाली.

पण विधि यथासांग होण्यास अग्नीचा समारोप करून घरीं गेल्यावर अग्नि सिध्द करून गृहप्रवेशनीय होम यथासांग करण्याची कै. शिवरामशास्त्री गोरे यांची तोड सर्वमान्य होण्यास कांहींच हरकत नाहीं.पुणें प्रांतीं व कोंकणांत असेंच करण्याचा संप्रदाय आहे असें कै. गोरे म्हणतात.

विधिदृष्ट्या पाहूं गेल्यास हा भाग वधूवर अत्यंत परिणामकारक आहे. आणि वरालाहि आपल्या पत्नीस आज कोणत्या जबाबदारीवर आरूढ करीत आहोंत याची जाणीव देणारा हा भाग आहे.

## गृहप्रवेश

गृहप्रवेशाचा विधि सूत्रांत नाहीं. पण व्यवहारांत त्याला अत्यंत महत्त्व आहे आणि अनेकदृष्ट्या तें बरोबर आहे.कैरसुणीसुद्धां पायगुणाची होते ही तर प्रत्यक्ष चालती बोलती लक्ष्मी. तिच्या येण्याचा घरादारावर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष चांगला वाईट परिणाम होणारच !

परिणाम चांगलाच व्हावा अशी सर्वांचीच इच्छा असणार. त्या दृष्टीनें शुभ मूहूर्त वगैरे पहाण्यांत येतात. तिच्या हातून घरांत आल्याबरोबर महालक्ष्मीची पुजा करतात. साखर वाटतात. ' कोण आली , 'लक्ष्मी आली 'असें वाक्योच्चार करण्यांत येतात. अशा प्रकारें वाजत गाजत, मोठ्या समारंभानें वधूवरांना आपल्या वरील जबाबदारीची अप्रत्यक्ष जाणीव देण्यांत येते. आणि वधूवरांवर व आप्तइष्टावर या समारंभाचा खरोखर उत्कृष्ट परिणाम होतो.

अत्यंत अपरिचित कुटुंबांचेहि दुवे ह्याच समारंभानें एकत्र अखंड जोडले जातात. आई मुलीला तुमच्या ओटींत घातली आहे असें म्हणते. वराची माताहि आतां हें तिचेंच घर आहे असें म्हणून सद्गदित कंठानें निरोप देतात. इतर सुवासिनी, प्रौढ पुरुष व भिक्षुक हा वधुवरांचा जोडा जगाला आदर्श होवो अशा अर्थाचें आपआपल्या परीनें आशीर्वाद देतात. अशा प्रकारें हा विवाह विधि संपतो व लोक आपल्या घरोघर जातात. गृहप्रवेशांत जे मंत्र म्हटले जातात ते अत्यंत अर्थपूर्ण आहेत. ते असे:—

हे वधू, तुझा ह्या घरांत मुलेबाळें होऊन उत्कर्ष व्हावा. तूं घरधनीणपणाविषयीं तत्पर असावेस. ह्या नवऱ्याशीं सह तूं सुखांत असावेस. लोकांनीं म्हणावें कीं हे या घरांत म्हातारे झाले. ( १०. ८५. १७ )

चाळणीनें सातु चाळावेत त्याप्रमाणें थोर लोक विचार करून बोलतात म्हणून त्यांची मैत्री जमते. खरोखर त्यांच्या जिव्हेवर लक्ष्मी असते. म्हणून तुम्ही गोड बोलून मैत्री जोडा. ( १०. ७१. २ )

## ऐरिणीप्रदान

हा विधि सूत्रांत सांगितलेला नाहीं. हा न केला तरी विवाहसंस्कारांत कोणत्याहि प्रकारचें वैगुण्य रहात नाहीं. पण आप्तस्वकीयांना मानपानाचा पुरवठा करण्यास हा विधि उपयोगी पडतो. विवाहाचें मुख्य उद्दिष्ट वंशवृद्धि हें या विधींत साध्या पद्धतीनें फार चांगलें गोवलें आहे.

ऐरिणी म्हणजे वेळूची केलेली लहान सोळा सुपें व वेळूचीच मोठी डाली इतक्यास ऐरिणी असें म्हणतात. डाली डोक्यावर देणें हा मोठा सन्मान समजण्यांत येतो.

वंशवृद्धीकरतां ऐरिणीपूजन व वराच्या आईला ऐरिणीदान करावयाचें असतें. तेथील सर्व मंत्रहि अशाच अर्थाचे आहेत. मंत्रांचा अर्थ जरी समजत नसला तरी हे विधि चालले असतां त्या मंत्रांच्या अर्थाचें बरोबर प्रतिबिंब तेथें उमटलें जातें. हाच खरोखर अशा विधींचा परिणाम होय.

## विवाहांतील अवडंबर.

अनेक प्रकारच्या कारणांनीं उत्पन्न झालेले गौण व मुख्य धार्मिक विधि बाजूला पडून शिवाय अनेक लौकिक प्रकार विवाहांत घुसले आहेत.

उदाहरणार्थ रुखवत, उष्टीहळद, तेलफळ, सुनमुख, आंबवण, पायघड्या, रासन्हाणें, साडे, वरात, दारूकाम, उखाणे, जुळा टाकणें, रंग टाकणें, व्याहीविहिणींच्या पंक्ति, नाच, गाणें, इत्यादि अनेक वेगवेगळे आचार लोकांत अत्यंत रूढ झाले आहेत. शास्त्रीय विधि फक्त भटजींच्या ताब्यांत, बाकी हे सर्व विधि तरुणतरुणींनीं आपल्या ताब्यांत घेतले आहेत. त्यामुळें स्वाभाविकच धार्मिक विधींपेक्षां हे सर्व प्रकार आकर्षक होतात व तिकडे सर्वांचें लक्ष वेधलें जातें. त्यांतहि वेगवेगळ्या अवस्थेंतील माणसांच्या हौशी पुरविण्याचाच एक एक मार्ग आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तथापि अशा अनवश्यक गोष्टींचा शक्य तितका पाठपुरावा होऊन त्यांतील त्याज्य व अयोग्य भाग म छाट द्यावयास पाहिजे व शास्त्रीय विवाहविधींतील भागासच शक्य तितकें आकर्षक रूप देण्याची खटपट झाली पाहिजे. श्रीमंतांच्या फाजील चैनी प्रवृत्तीमुळें व समाजांत अनुकरणबुद्धि विशेष, त्यामुळें अनेक लोक विवाहाच्यापायीं धुळीस मिळाल्याचीं उदाहरणें सध्यांहि दृष्टोत्पत्तीस येतात, ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे. उपयुक्ततावादाला अन्त नाहीं. पण त्यांतहि तारतम्य ठेवलें पाहिजे. तथापि समाजांत तुसडेपणाची प्रवृत्ति वाढत्या प्रमाणांत आहे असें आढळून येते. तुसडेपणा स्वार्थमूलक असल्यामुळें सामाजिक संघटनेस मोठाच बाध येतो. लग्नकार्याच्या मिषानें भिन्नजातींतहि जी आपुलकी दिसत असे ती सध्यां तरी फारच रोडावल्यासारखी दिसते. याकरतां एखादी जेवणावळ कमी झाली तरी चालेल, पण बसून पानसुपारीसारखे समारंभ होणें आवश्यक आहे.

## विवाहांतील लौकिक गोष्टी.

१ वधूचें अगर वराचें आगमन. २ तिथिनिश्चय. ३ अक्षत. ४ कुंकुमपत्रिका पाठविणें. ५ घाणा भरणें ६ साखरपुडा. ७ टिळा. ८ हळद व उष्टीहळद. ९ गडगनेर (केळवण). १० तेलसाडी व तेलफळ ११ कढीभात १२ रुखवत. १३ वरप्रस्थान. १४ आंबवण. १५ वराचे रुसणें. १६ सुनमुख. १७ व्याही जेवण. १८ फळफळावळीनें वधूची ओटी भरणें. १९ वरात. ( वधूवरांचें प्रत्यागमन ) २० पायघड्या. २१ रासन्हाणीं. २२ हळद खेळणें. २३ सुपाऱ्या लपविणें. २४ विडया तोडणें. २५ झेंडा नाचविणें. २६ गोंधळ. २७ मांडवपरातनें.

वगैरे अनेक विशेष आचार विवाहसंस्कारांत करण्यांत येतात आणि समंजस माणसासहि ते टाळतां येत नाहींत. फार काय बायकामुलांच्या दृष्टीनें हाच विवाहसंस्कारांतील मुख्य भाग समजला जातो.

## वधूलक्षणपरीक्षा.

वधूवरांचीं कुळें शुद्ध आहेत म्हणजे क्षय, अपस्मार, कुष्ठ असले अपरिहार्य रोग त्या कुळांत आनुवंशिक चालत आलेले नाहींत आणि तीं कुळें सदाचारसंपन्न आहेत अशी खात्री झाल्यावर सांपिड्य व गोत्रप्रवर ह्यांचा विचार करावा. वर बुद्धिमान्, विद्वान्, सुशील व निरोगी असावा. तशीच वधूहि बुद्धिमती, रूपवती, निरोगी, सुशील आणि लक्षणसंपन्न म्हणजे वंध्यत्व, पतिघातित्व इत्यादि दुर्लक्षणरहित अशी असावी. वंध्यत्वादि लक्षणें समजणें फार कठिण आहे म्हणून पुढें सांगितलेल्या रीतीनें त्यांची परीक्षा करावी.

१ दोन पीकें निघणारी जमीन, २ गोठा, ३ अवशिष्ट दर्भसमिधा टाकण्याची जागा, ४ न आटणारा पाण्याचा डोह,५ जुगार खेळण्याची जागा ६ चवाटा, ७ अपीक खारी जमीन, ८ स्मशान' ह्या आठ ठिकाणची माती आणून तिचे निरनिराळे आंब्याएवढे गोळे करून ते एका पाटावर खुणेनें मांडावे आणि " ऋतमग्रे प्रथमं जज्ञ ऋते सत्यं प्रतिष्ठितम् । यदियं कुमार्यभिजाता तदियमिह प्रतिपद्यतां यत्सत्यं तद्दृश्यताम् ॥ह्या मंत्रानें त्यांचें अभिमंत्रण करावें. आणि वधूला सांगावें कीं ह्या आठ गोळ्यांतून तुला वाटेल तो एक गोळा उचलून घे. जो उचलील त्याचें फळ पुढील अनुक्रमानें समजावें.१ धनधान्य संपन्न २ गाईबैल म्हशी वगैरे पशुसंपत्तीनें युक्त, ३ वेदशास्त्रपारंगत, ४ सर्व प्रकारची संपत्ति, ५ जुगार, ६ व्यभिचारिणी,७ दरिद्री,८ पतिघ्नी अशा प्रकारें वधूपरीक्षा करून ती शुभलक्षणी ठरेलतर तिला वरावी ही जुनी वधूपरीक्षेची पद्धति आहे. ( आश्वलायन गृह्यसूत्र १.५ )

पण गोभिल गृह्यसूत्रांत लक्षणज्ञाकडून वधूची परीक्षा अशक्य असल्यास वधूची वरीलप्रमाणें परीक्षा करावी असें सांगितलें आहे. आणि तेंच योग्य आहे. आश्वलायनसूत्रांत कन्यापरीक्षणाचा जो प्रकार सांगितला आहे त्याविषयीं गोभिल गृह्यसूत्रांत थोडक्यांत चांगला खुलासा केला आहे. तेथें–

लक्षणप्रशस्तान् कुशलेन ॥२॥ तदलाभे पिण्डान्॥ ३ ॥ प्रपा. १. खं.१०

सुलक्षणी मुलगी लक्षणज्ञ माणसाकडून परीक्षून करावी. लक्षणज्ञ न मिळाल्यास आश्वलायनसूत्राप्रमाणें पिण्डपरीक्षा करावी.

## सापिंड्यनिर्णय.

सापिंड्य म्हणजे सपिंडपणा, सापिंड ह्या शब्दापासून सापिंड्य शब्द झाला आहे. स-समान म्हणजे एक पिंड म्हणजे मूळपुरुष ज्यांचा ते सपिंड. वधूवरांचा मूळपुरुष एक असेल तर ते परस्पर सपिंड होतात, सपिंडांचा विवाह करूं नये असा धर्मशास्त्राचा नियम आहे. पण अशा पद्धतीनें सपिंडता पाहूं गेल्यास विवाह होणेंच दुर्घट होईल. म्हणून सापिंड्य निवृत्तीविषयीं आपल्या धर्मशास्त्रांत नियम सांगितले आहेत.

वधूवरांचा पिता मूळपुरुषापासून सातवा असेल आणि त्यांची माता त्यापासून पांचवी असेल तर पुढें अनुक्रमें आठव्या व सहाव्या पिढीला सापिंड्य निवृत्त होतें. वधूवरांच्या पित्याकडून जो मूळपुरुषाकडे संबंध पोंचतो त्यास पितृद्वारक सापिंड्य म्हणतात, आणि त्याच्या मातेकडून जो त्याच्याकडे संबंध पोंचतो त्यास मातृद्वारक सापिंड्य म्हणतात. पितृद्वारक सापिंड्य सात पिढ्यांपर्यंत मानावयाचें, पुढें आठव्या पिढीपासून मानावयास नको. तसेंच मातृद्वारक सापिंड्य पांच पिढ्यापर्यंत मानावयाचें, पुढें सहाव्या पिढीपासून मानावयास नको. अशा रीतीनें झालेल्या सापिंड्यनिवृत्तीचे प्रकार चार होतात. १ पितृद्वारक, २ मातृद्वारक, ३ मंडूकप्लुति आणि ४ एकतोनिवृत्तान्यतोनुवृत्त. ह्यांचीं अनुक्रमें उदाहरणें--

### उदाहरण पहिलें— पितृद्वारक सापिंड्य.

| | मूळपुरुष | |
|---|---|---|
| | विष्णु | |
| | १ | |
| कांति | २ | गौरी |
| सुधी | ३ | हर |
| बुध | ४ | मेत्र |
| चैत्र | ५ | शिव |
| गण | ६ | भूप |

मूळ पुरुष विष्णु ह्याच्या कन्या कांति व गौरी ह्याच्या संततींत उत्पन्न झालेली रति ही कन्या आणि काम हा पुत्र ह्यांचा मुळपुरुषाशीं, मृड व अच्युत ह्या पित्यांच्या द्वारानें संबंध पोंचत असून हे दोघे मूळपुरुषापासून सातवे आहेत. हे पितृद्वारक सापिंड्य आहे, म्हणून तें सात पिढ्यांपर्यंतच मानावयाचें आहे; अर्थात ह्यांच्या संततीची सापिंड्यनिवृत्ति झाली म्हणून रति आणि

मृड ७ अच्युत|काम ह्यांच्या विवाहाला सापिंड्यांचा प्रति-
रति ८ काम बंध नाहीं.

## उदाहरण दुसरें–मातृद्वारक सापिंड्य.

मूळपुरुष
विष्णु
१
दत्त २ चैत्र
सोम ३ मैत्र
सुधी ४ बुध
श्यामा ५ रति
शिव ६ गौरी

ह्या उदाहरणांत शिव आणि गौरी ह्यांचा, श्यामा आणि रति ह्या मातेच्या द्वारानें मूळ पुरुषांशीं संबंध पोंचला असून ह्या दोघी मूळपुरुषापासून पांचव्या आहेत. मातृद्वारक सापिंड्य पांचव्या पिढीपर्यंत चालून सहाव्या पिढीला निवृत्त होतें असा नियम आहे. म्हणून शिव व गौरी ह्यांच्या विवाहाला सापिंड्याचा प्रतिबंध राहिला नाहीं.

## उदाहरण तिसरें–मंडूकप्लुति सापिंड्य

मूळ पुरुष
विष्णु
१
दत्त २ चैत्र
सोम ३ मैत्र
सुधी ४ बुध
श्यामा ५ नर्मदा
शिव ६ काम
रमा ७ कवि

ह्या उदाहरणांत श्यामा आणि नर्मदा ह्या मूळ पुरुषापासून पांचव्या आहेत, म्हणून त्यांचे पुत्र जे शिव आणि काम ह्यांचें सापिंड्य मातृद्वारक असल्यामुळें निवृत्त झालें होतें, परंतु शिव आणि काम ह्यांची संतति जी रमा आणि कवि ह्यांचें सापिंड्य निवृत्त होत नाहीं; कारण त्यांचा मूळपुरुषांशीं जो संबंध पोंचला, तो पितृद्वारक म्हणून सात पिढ्यांपर्यंत चालणारा आहे, अर्थात् रमा व कवि ह्यांच्या संततीचा परस्पर विवाह होईल, पण रमा व कवि ह्यांचा होणार नाहीं. ह्या उदाहरणांत सहाव्या पिढीला सापिंड्य निवृत्त झालें असून पुनः सातव्या पिढीला अनुवृत्त झालें म्हणून ह्याला मंडूकप्लुति सापिंड्य म्हणतात.

## उदाहरण चौथें—एकतोनिवृत्तान्यतोनुवृत्त

मूळपुरुष
विष्णु
१

ह्या उदाहरणांत श्यामा ही मूळपुरुषापासून पांचवी असल्यामुळें तिची कन्या जी कांति तिचें सापिंड्य मातृद्वारक त्यामुळें निवृत्त झालें आहे. पण द्वितीय संततींतील सहाव

| | | |
|---|---|---|
| दत्त २ चैत्र | जो हर त्याचा मूळपुरुषाशीं असलेला सापिंड्यसंबंध पितृद्वा- | |
| सोम ३ मैत्र | रक असल्यामुळें तो सहाव्या पिढीला निवृत्त न होतां आठ- | |
| सुधी ४ बुध | व्या पिढीला निवृत्त होणारा आहे. म्हणून हराचा कांतीशीं | |
| श्यामा५ शिव | विवाह होत नाहीं. ह्या उदाहरणांत एका बाजूनें सापिंड्य- | |
| कांति ६ हर | निवृत्ति झाली होती पण दुसऱ्या बाजूनें ती झालेली नाहीं. | |

म्हणून याला एकतोनिवृत्तान्यतोनुवृत्त असें नांव आहे. हा सापिंड्यनिर्णयाचा प्रकार झाला. सापिंड्यसंकोचाविषयीं पुढें लिहिलें आहे.

## मामाचें गोत्र पहाण्याची चाल

मामाचें गोत्र पहाण्याची चाल माध्यंदिनशाखेच्या लोकांतच फक्त आहे. इतर शाखेच्या लोकांत नाहीं. देशस्थ ऋग्वेदी व काण्व शाखेच्या लोकांत मामाची मुलगी करण्याची चालही प्रचलित आहे. मामाचें गोत्र पहाण्याविषयीं ' मातुलस्य सुतामूढा मातृगोत्रां तथैव च । समानप्रवरां चैव गत्वा चांद्रायणं चरेत् ॥ असें शातातपाचें वचन आहे. पण हें निर्मूल आहे असें संस्काररत्नमालाकार गोपीनाथभट्टादिकांचें म्हणणें आहे.

उलट मातुलकन्यापरिणयाला श्रौत आधार आहे. ' तृप्तां जुहुमातुलस्येव योषां० ( ख०१४.६) हे श्रौतलिंग स्मृतिवचनाचा बाध करीत असल्यामुळें मातुलगोत्र पहाण्याची चाल निर्मूल आहे असेंच म्हणणें भाग आहे.

शिवाय पूर्वकालींहि ही रूढि सर्वमान्य होती असें ग्रंथ व लोकाचार यावरून दिसत नाहीं. नाहीं तर ती सर्वांत सारखीच रूढ असती.

मातुलकन्यापरिणयाचा उल्लेख अनाचार म्हणून धर्मसूत्रापासून आहे. पण मातुलगोत्र पाळण्याबद्दलचा इतका प्राचीन उल्लेख नाहीं.वास्तविक मातुलगोत्र माध्यंदिनांनीं पाळण्याची आवश्यकता नाहीं. मातुलगोत्र माध्यंदिनांनींच कां पाळावें ? सर्वांनींच पाळावयास पाहिजे. सर्वांनीं पाळावयाची आवश्यकता नसेल तर माध्यंदिनांनींच कां पाळावें ?

माध्यंदिन व इतरशाखीय यांचा परस्परांत विवाह होण्यास हरकत नाहीं अशाविषयीं के. हरिशास्त्री गर्गे यांचे बारा वर्षांपूर्वींचें पत्र सोबत जोडलें आहे. त्यावरूनहि त्या शाखेतील तज्ज्ञांचें याविषयीं विरुद्ध मत नाहीं असें

दिसतें. शिवाय भिन्नशाखीय विवाह झाल्यानें ज्यांना मातुलगोत्र पाळावयाचें असेल त्यांनाहि हरकत येण्याचा संभव नाहीं. ज्या भिन्नशाखांत सध्यां विवाह रूढ आहेत त्यांच्या शाखानियमाला विवाहसंबंधामुळें कोणताहि बाध आलेला नाहीं. यावरून माध्यंदिन व इतर शाखीय यांच्यांत विवाह होण्यास कांहींच हरकत नाहीं.असाच अकोल्याच्या ब्राह्मणपरिषदेंत नुकताच ठराव करण्यांत आला.

वर्ध्याचे रा. लक्ष्मण राजाराम अत्रे वकील यांना के. हरीशास्त्री गर्गे यांनीं पाठविलेल्या पत्राची नक्कलः—

श्री

ता. १६।७।१५ पंचवटी नाशिक

अनेक आशीर्वाद. वि.वि. आपले कार्डाचें उत्तर—देशस्थ व कोकणस्थ यांचे परस्परविवाह होण्यास कांहीं शास्त्रीय प्रतिबंध नाहीं.

उद्वहेत्तु द्विजो भार्यां सवर्णां लक्षणैर्युतां ।
अव्यंगांगीं सौम्यनाम्नीं मृदंवगीं च मनोहरां ॥

यांत सवर्णां असें पद आहे. त्याचा अर्थ समान वर्णाची असावी. वर्ण म्हणजे-ब्राह्मण क्षत्रिय वैश्य व शूद्र असेच आहेत.कोकणस्थ,देशस्थ, यजुर्वेदी, हिरण्यकेशी, कण्व यांत शाखाभेद आहे. वर्ण निराळा नाहीं, यामुळें पाहिजे त्या ब्राह्मणांनीं पाहिजे त्या शाखेतील कन्या करण्यास बिलकूल शास्त्रीय प्रतिबंध नाहीं. प्रीतीविवाह शास्त्रसंमत नाहीं काय याचें उत्तर ८।४ दिवसांत पाठवितों. येथें याजुषशाखेंत सर्वत्र प्रीतिविवाह करणेचा संप्रदाय आहे. पण धर्म शास्त्रांत पाहतां आधार सांपडत नाहीं. ज्योतिषांत आधार पाहून कळवितों. मी येथें नसल्यानें उत्तरास विलंब जाला याची माफी असावी. उत्तराकर्ता कार्डाचें कारण नवते तसें पुनः न करावें लोभ असावा हे विज्ञापना

हरी शास्त्री गर्गे

## भिन्नशाखीय विवाह.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद अशा चारहि वेदांतील परस्परांत विवाह सध्यां होत असतात व त्याला रूढि व शास्त्र दृष्ट्या हरकत आहे असेंहि दिसत नाहीं. माध्यंदिन व इतरशाखीय लोकांत सध्यां विवाह होत नाहींत. पण ते होण्यास हरकत नाहीं. त्याचा विचार वर आला आहे.

## पंच द्राविड व पंच गौड ब्राह्मण

सर्व हिंदुस्थानांत ब्राह्मणांत गौड आणि द्राविड असे मुख्य दोन भेद आहेत. आणि त्यांत प्रत्येकीं पांच देशभेदावरून भेद पडले आहेत. त्यांचे वर्णन पुढीलप्रमाणें केलेलें आढळतें.

### पंच गौड

सारस्वताः कान्यकुब्जा गौडा मैथिलिकोत्कलाः ।
पंच गौडा भवंत्येते विंध्यादुत्तरवासिनः ॥

सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, मैथिल आणि उत्कल हे विंध्याच्या उत्तरभागीं रहाणारे पंच गौड होत.

### पंचद्राविड

द्राविडाश्चांध्र-कर्नाट-महाराष्ट्राश्च गुर्जराः ।
पंचैते द्राविडाः प्रोक्ता विंध्याद्दक्षिणवासिनः ॥

द्रविड, आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र आणि गुर्जर हे विंध्याच्या दक्षिणभागांत राहाणारे द्राविड ब्राह्मण होत.

पंच द्राविडांत गुर्जराखेरीज करून सर्वांत बेटीव्यवहार सध्यांहि चालू आहे असें देशस्थ ब्राह्मणांतील मान्य आचारावरून दिसतें.

गौडांत कांहीं जाती मत्स्याहारी आहेत. त्यामुळें त्यांच्याशीं रोटीबेटीव्यवहार ठेवणें द्राविडांच्या मनाला रुचत नाहीं.

दोनहि ब्राह्मण आपल्या जातिसंरक्षणाकरतां वाटेल तें मोल देण्यास सज्ज आहेत असें त्यांच्या इतिहासांवरून दिसतें.

### पुनर्विवाह

पुनर्विवाहाला तीव्र विरोध करणारा आणि पुनर्विवाहाचा पुरस्कार करणारा असे दोन पक्ष पुढारलेल्या जातींत आज साठ वर्षांपूर्वीपासून आहेत. दोनहि प्रकारचीं वचनें वेदापासून पुराणापर्यंतच्या ग्रंथांतून दाखविण्यांत येतात. त्या वचनांची वासलात लावण्याचे प्रकारहि विविध उत्पन्न झाले आहेत त्याकरतां अनेक ग्रंथ निर्माण झाले आहेत. म्हणून त्यांचा येथें विचार करीत नाहीं. पण एवढें मात्र ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, पुनर्विवाहितांचा वर्ग निर्माण होतो आहे. टाळून किंवा बहिष्कार घालून तो दडपला जात नाहीं. अशा

स्थितींत असणाऱ्या किंवा उत्पन्न होणाऱ्या लोकांची व्यवस्था लावणें हें एक सामाजिक कर्तव्य आहे. धर्मविधि, व्रतवैकल्यें त्यांचींही चाललीं पाहिजेत. व त्यांच्या संततींस किंवा त्यांना अगदींच ख्रिस्ती मुसलमान झाले असें समजणें घातुक होईल. करतां त्यांचे संस्कार करणें किंवा त्यांच्या धार्मिक भावनांची जोपासना करणें हें धर्मज्ञ ब्राह्मणांचें कर्तव्य आहे. तें त्यांना टाळतां येणार नाहीं.

पुनर्विवाह लावणारा कोणीही मनुष्य पुनर्विवाह श्रेष्ठ आहे असें समजत असेल तर त्याचे कान उपटून हातांत द्यावयास पाहिजेत. पण स्त्रियांच्या दुराचाराला वळण देण्यास त्याशिवाय मार्ग नाहीं हें जाणून कांहीं मर्यादेंत अशांचा संग्रह करावयास पाहिजे व त्यांच्या धार्मिक भावनास आधार द्यावयास पाहिजे.

पुनर्विवाह लावण्यास योग्य माणसें न मिळाल्यानें आणि पुनर्विवाहित संततीची योग्य व्यवस्था न लागल्यानें धर्मान्तर केल्याची व प्रचलित हिंदु धर्मीयांचे कट्टे द्वेष्टे बनल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. ही स्थिति डोळ्याआड करून चालणार नाहीं. संग्रह करा नाहीं तर व्यवस्था लावा असें आग्रहाचें निवेदन आहे.

### सापिंड्यसंकोच.

वर जे पितृद्वारक आणि मातृद्वारक सात व पांच पिढ्यांचें सापिंड्य सांगितलें, त्याचा संकोच करून तिसऱ्या पिढीपासूनहि विवाह करावा, असें कांहीं ऋषींचें मत आहे. परंतु अत्यंत संकटसमयींच त्याचा उपयोग करावा, असेंच त्यांनीं सांगितलें आहे. हा पक्ष अगदीं गौण आहे. तरी अशा सापिंड्यसंकोचानें विवाह करण्याचा कांहीं ब्राह्मणांत प्रचार आहे. म्हणून त्यांतही जे विधिनिषेध आहेत तेहि आवश्य सांगितले पाहिजेत.

१ मूळ पुरुषापासून तिसऱ्या पुरुषानें तिसऱ्या कन्येशींच आणि तोंहि ज्यांच्या कुलांत मातुलकन्यापरिणयाचा शिष्टसंमत संप्रदाय परंपरेनें चालत आला असेल त्यानेंच विवाह करावा. तिसऱ्याशिवाय चतुर्थादि सप्तमपर्यंत कोणत्याहि पुरुषानें तृतीय कन्येशीं विवाह करूं नये.

चतुर्थ कन्येशीं चतुर्थ व पंचम ह्या दोघांनींच विवाह करावा. पंचम कन्येशीं पांचव्या व तिसऱ्यापासून सातव्यापर्यंत सर्वांनीं विवाह करावा.

सहाव्या कन्येशीं पांचवा व सहावा यांनींच विवाह करावा. सातव्या कन्येशीं तिसऱ्यापासून सातव्यापर्यंत सर्वांनीं विवाह करावा.

असा हा सापिंड्यसंकोचाच प्रकार आहे.

## दत्तकसापिंड्य

भावाचा मुलगा किंवा भाऊबंदपैकीं कोणताहि मुलगा दत्तक घेतला तर तो सपिंडच आहे म्हणून त्याच्याबद्दल सापिंड्यविचार करण्याचें कारणच नाहीं. परगोत्रांतील मुलगा दत्तक घेतला असेल तर त्याला जनक व पालक ह्या दोनहि बापांचीं गोत्रें पाळलीं पाहिजेत. म्हणजे उभयगोत्रांशीं जुळणाऱ्या गोत्रांतीलच कन्येशीं त्याला विवाह करतां येतो. हा दोन गोत्रांचा संबंध कांहीं विवक्षित पिढ्यांनीं सुटतो असेंहि नाहीं, तर दत्तक, त्याची संतति, व सपिंड यांनीं हा नियम निरंतर पाळला पाहिजे.

उपनयन झालेला परगोत्रांतील मुलगा दत्तक घेतला असेल तर, जनक मातापितरांचें अनुक्रमें पांच व सात पिढ्या आणि पालक मातापितरांचें तीन पिढ्या सापिंड्य धरावें. परगोत्रांतील दत्तक घेऊन पालकानें उपनयनादि संस्कार केले असतील तर,जनक व पालक पित्यांचें पांच पिढ्या व जनक पालक मातांचें तीन पिढ्या सापिंड्य पाळावें. परगोत्रांतील दत्तक घेऊन पालकानें जातकर्मादि संस्कार केले असतील तर पालक मातापितरांचे अनुक्रमें पांच व सात पिढ्या आणि जनक मातापितरांचें तीन पिढ्या सापिंड्य धरावें. हाहि नियम दत्तकाच्या संततीला पाळला पाहिजे. त्याचप्रमाणें परगोत्रांतील कन्या दत्तक घेतली असेल तर जनक व पालक ह्या दोनहि पित्यांचीं गोत्रें विवाहाला वर्ज्य केलीं पाहिजेत.

## प्रतिकूलविचार.

विवाहनिश्चय झाल्यावर वराच्या किंवा वधूच्या सगोत्र त्रिपुरुषात्मक कुलांत कोणी मरण पावेल तर प्रतिकूलतेचा दोष होतो.अर्थात् निश्चित केलेल्या वधूवरांचा विवाह होत नाहीं. करणेंच असेल तर शांति तरी केलीच पाहिजे.

## विरुद्धसंबंध

सापिंड्यसंबंध नसूनहि विरुद्ध संबंध असेल तर विवाह होत नाहीं. विरुद्ध संबंध म्हणजे—वधूवरयोः परस्परं पितृमातृसाम्ये विरुद्धसंबंधः-- वधूवरांचा

परस्परांत नात्यानें आईबाप असा संबंध येईल तर तो विरुद्ध संबंध. जसें बायकोच्या बहिणीची मुलगी ही नात्यानें मुलगीच होय, तशीच चुलत्याच्या बायकोची बहीण ही नात्यानें माता होय,म्हणून ह्यांच्याशीं विवाह होत नाहीं. ह्याचप्रमाणें आईच्या सवतीची बहीण व तिची कन्या ह्यांच्याशीं विवाह करूं नये. तसेंच भगिनीची कन्या वगैरे पतिपत्नीच्या नात्याला विरुद्ध वाटणारे सर्व संबंध विरुद्ध असून त्यांच्याशीं विवाह करूं नये.

## गोत्रप्रवरनिर्णय.

१ भृगु, २ जमदग्नि, ३ गौतम, ४ भरद्वाज, ५ अंगिरा, ६ अत्रि, ७ विश्वामित्र, ८ कश्यप, ९ वसिष्ठ, १० अगस्त्य. या दहा ऋषींच्या संततीला गोत्र असें म्हणतात. जमदग्नि हा भृगुवंशांतील आणि गौतम व भरद्वाज हे अंगिरावंशांतील असूनहि त्यांचें स्वतंत्र गोत्रप्रवर्तकत्व मान्य करण्यांत आलें आहे.

यद्यपि गोत्रें अनंत आहेत, तरी ह्या दहा ऋषींच्या संततींतच त्या सर्वांचा समावेश होतो. आणि प्रवर म्हणजे त्या त्या ऋषींच्या कुलांत झालेल्या मंत्रद्रष्ट्या महत्त्वाच्या व्यक्ति किंवा गोत्रप्रवर्तकांची पितृत्रयी होय.

गोत्र व प्रवर हे पृथक् पृथक् विवाहप्रतिबंधक आहेत. म्हणजे वधूवरांचें गोत्र एक असेल तर विवाह होत नाहीं आणि प्रवर एकसारखे असतील तरी विवाह होत नाहीं. गोत्र एकच असतें पण कांहीं थोडे द्विगोत्रहि असतात. पण प्रवर एकापासून पांचपर्यंत असतात. मात्र चार केव्हांही नसतात त्यांत केव्हां एकप्रवरसाम्य,केव्हां द्विप्रवरसाम्य व केव्हां त्रिप्रवरसाम्य येतें.

केवळ भृगु व केवळ आंगिरस ह्या गोत्रांपैकीं जे पंचप्रवरी असतील त्यांचे तीन प्रवर समान असतील आणि त्रिप्रवरी असतील त्यांचे जर दोन प्रवर समान असतील तरच विवाह होत नाहीं. अर्थात पांचांत दोन व तिहींत एक प्रवर समान आला तरी विवाहाला प्रतिबंध होत नाहीं ह्या दोन गोत्राशिवाय इतर गोत्रांत मात्र एक प्रवर समान आला तरी विवाह होत नाहीं. जमदग्नि, गौतम व भरद्वाज ह्या गोत्रांत क्वचित पंचप्रवरांत एक प्रवर समान असूनही विवाह होत नाहीं आणि क्वचित प्रवर साम्य नसताहि विवाह होत नाहीं असें आहे. परंतु त्याचें कारण समानप्रवर हें नसून सगोत्रत्व हें आहे.

पुढें गोत्रें व त्यांचे पोटभेद संख्येनें दाखविले आहेत. कारण, त्यांचीं

नांवें सांगितलेलीं नाहींत. त्यामुळें कोणतेंही अपरिचित गोत्राचें नांव आलें कीं तें कोणत्यांतील पोटभेद आहे हें प्रवरसाम्यावरून ओळखावयास हवें.

## गोत्रें व त्यांचें पोट भेद.

जमदग्नीचे पोटभेद २, भृगूचे पोटभेद ५, गौतमाचे १० भरद्वाजाचे ४, अंगीरांचे ४, विश्वामित्राचे १०, कश्यपाचे ३, वसिष्ठाचे ४, आणि अगस्तीचे, १० मिळोन ५२ आणि कीतीएक ऋषींच्या व ग्रंथकारांच्या मतानें भृगुगणामध्यें आणखी ५, गौतमांत २, भरद्वाजांत १, अत्रींत ६, विश्वामित्रांत ११ व कश्यपांत १ मिळून २६ अधिक आहेत.

### १ जमदग्नीचे भेद २–वत्स आणि बिद

१. **वत्स**— वत्स, मार्कंडेय, मांडूकेय इत्यादि दोनशेंपेक्षां अधिक वत्स गोत्राचे पोटभेद आहेत. त्या सर्वांचे भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व आणि जामदग्नय असे पांच; किंवा भार्गव, और्व, जामदग्नय असे तीन; किंवा भार्गव, च्यावन, आप्नवान असे तीन प्रवर आहेत.

२ बिद—बिद, शल, अवट इत्यादि विसांहून अधिक बिदाचे पोटभेद आहेत. त्यांचे भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व आणि बैद असे पांच; किंवा भार्गव, और्व, जामदग्नय असे तीन प्रवर आहेत.

### २ भृगूचे पोटभेद १०.

१ आर्ष्टिषेण, २ यस्क, ३ मित्रयु ४ वन्य, ५ शुनक, ६ वात्स्य, ७ वत्सपुरोधस, ८ बैजमथित, ९ वेदविश्वज्योतिष, आणि १० शाठरमाठर.

१ **आर्ष्टिषेणांचे**—आर्ष्टिषेण, नैऋत, याम्यायण इत्यादि विसापेक्षां अधिक पोटभेद आहेत. त्यांचे भार्गव, च्यावन, आप्नवान, आर्ष्टिषेण व अनूप असे पांच; किंवा भार्गव, आर्ष्टिषेण,अनूप असे तीन प्रवर आहेत.

हे आर्ष्टिषेण व पूर्वींचे वत्स व बिद ह्या तिघांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, पंचप्रवरी आहेत त्यांचे त्रिप्रवरसाम्य व त्रिप्रवरी आहेत त्यांचें द्विप्रवरसाम्य येते. तसेंच वत्स व बिद ह्यांचें गोत्रहि एकच आहे.यद्यपि त्रिप्रवर आर्ष्टिषेणाचे, वत्स व बिद ह्यांच्याशीं द्विप्रवरसाम्य नाहीं तरी पाक्षिक पंचप्रवरामध्यें त्यांचें त्रिप्रवरसाम्य आहे. त्रिप्रवरामध्यें द्विप्रवरसाम्य नसतांहि पाक्षिक

पंचप्रवरामध्यें त्रिप्रवरसाम्य असेल तर तेंहि त्रिप्रवरांच्या विवाहाला बाधक होतें. त्याचप्रमाणें पुढें सर्वत्र समजावें.

२. यस्कांचे—यस्क, मौन, मूक इत्यादि त्रेपन्नापेक्षां अधिक पोटभेद, त्यांचे भार्गव, वैतहव्य, सावेतस असे तीन प्रवर आहेत.

३. मित्रयूंचे—मित्रयु, रौष्ट्यायन, सापिंडन इत्यादि तिसापेक्षां अधिक भेद आहेत. त्यांचे भार्गव, वाध्र्यश्व, दवोदास असे तीन; किंवा भार्गव, च्यावन दैवोदास असे तीन; अथवा वाध्र्यश्व असा एकच प्रवर.

४. वैन्यांचे—वन्य, पार्थ, बाष्कल आणि श्येत असे चार पोटभेद; त्यांचे भार्गव वैन्य आणि पार्थ असे तीन प्रवर.

५. शुनकांचे—शुनक, गार्त्समद, यज्ञपति इत्यादि सतरापेक्षां अधिक भेद आहेत. त्यांचे भार्गव, शौनहोत्र व गार्त्समद असे तीन; किंवा भार्गव आणि गार्त्समद असे दोन; किंवा गार्त्समद हा एकच; किंवा शौनक हा एकच प्रवर समजावा.

ह्या यस्कादि चार गोत्रांचा आपआपल्या पोटभेदांशीं मात्र विवाह होत नाहीं. परस्परांशीं व पूर्वीच्या सर्वांशीं होतो. मित्रयु आणि त्रिप्रवर वत्सादि यांचें पाक्षिक द्विप्रवरसाम्य येतें म्हणून त्यांचा विवाह होत नाहीं.

६. वात्स्यांचे—भार्गव, च्यावन, आप्नवान असे तीन प्रवर.

७. वत्सपुरोधसांचे—भार्गव, च्यावन, आप्नवान, वत्स्य आणि पौरोधस असे पांच प्रवर.

८. बैजमथितांचे—भार्गव, च्यावन, आप्नवान, बेज व मथित असे पांच प्रवर आहेत. ह्या तिघांचा परस्पर व पूर्वीच्या वत्स, बिद आणि आर्ष्टिषेण ह्या तिघांशांही विवाह होत नाहीं. कारण त्रिप्रवरसाम्य येतें.

९ वेदविश्वज्योतिषांचे—भार्गव, वेद आणि वैश्वज्योतिष असे तीन प्रवर.

१० शाठरमाठरांचे—भार्गव, शाठर, आणि माठर असे तीन प्रवर. ह्या दोघांचा परस्परांशीं व पूर्वीच्या सर्वांशीं विवाह होतो.

### ३ गौतम किंवा गौतमांगिरस यांचे भेद १२

१ आयास्य. २ शारद्वत. ३ कौमंड. ४ दीर्घतमस. ५ करेणुपालि. ६

वामदेव. ७औशनस. ८राहूगण. ९सोमराज.१०बृहदुक्थ. ११उचथ्य.१२राघुव.

१. आयास्यांचे—आयास्य, श्रोणिवेध, मूढरथ इत्यादि अठराहून अधिक पोटभेद, त्यांचे आंगिरस, आयास्य आणि गौतम असे तीन प्रवर.

२. शारद्वतांचे—शारद्वत, अभिजित, रौहिण इत्यादि सत्तराहून अधिक पोटभेद. त्यांचे आंगिरस, गौतम, शारद्वत असे तीन प्रवर आहेत.

३. कौमंडांचे—कौमंड, मान्मथरेपण, मासूराक्ष इत्यादि दहाहून अधिक पोटभेद. त्यांचे आंगिरस, औतथ्य, काक्षीवत, गौतम आणि कौमंड असे पांच; किंवा आंगिरस, औतथ्य, गौतम आणि कौमंड असे पांच; किंवा आंगिरस, औतथ्य, गौतम, औशिख आणि काक्षीवत असे पांच, किंवा आंगिरस, औशिज, काक्षीवत असे तीन; किंवा आंगिरस, आतथ्य, काक्षीवत असे तीन; अथवा औतथ्य, गोतम आणि कौमंड असे तीन प्रवर आहेत.

४. दीर्घतमसांचे—आंगिरस, औतथ्य, काक्षीवत, गोतम आणि दीर्घ-तमस असे पांच; किंवा आंगिरस औतथ्य, दीर्घतमस असे तीन प्रवर.

५. करेणुपालींचे—करेणुपालि, वास्तव्य, श्वेतीय इत्यादि सातांहून अधिक भेद आहेत. त्यांचे आंगिरस, गौतम, करेणुपाल असे तीन प्रवर आहेत.

६. वामदेवांचे—आंगिरस, वामदेव्य आणि गोतम असे तीन; किंवा आंगिरस, वामदेव्य आणि बार्हदुक्थ असे तीन प्रवर आहेत.

७. औशनसांचे—औशनस, दिश्य, प्रशस्त इत्यादि नवांहून अधिक भेद आहेत. त्यांचे आंगिरस, गोतम आणि औशनस असे तीन प्रवर आहेत.

८. राहूगणांचे—आंगिरस, राहुगण, गोतम असे तीन प्रवर.

९. सोमराजांचे—आंगिरस, सौमराज्य, गोतम असे तीन प्रवर आहेत.

१०. बृहदुक्थांचे—आंगिरस, बार्हदुक्थ, गोतम असे तीन प्रवर आहेत.

११. उचथ्यांचे—आंगिरस, औतथ्य, गोतम असे तीन प्रवर.

१२. राघुवांचे—आंगिरस, राघुव, गोतम असे तीन प्रवर आहेत. ह्या सर्व गोतमांगिरसांचा परस्परविवाह होत नाहीं, कारण गोत्र एक असून द्वित्रि-प्रवरसाम्यहि आहे.

### ४ भरद्वाज किंवा भरद्वाजांगिरस यांचे भेद. ५

१. भरद्वाज, २ गर्ग, ३ ऋक्ष, ४ कपि, ५ आत्मभू.

१. **भरद्वाजांचे**—भरद्वाज, क्षाम्यायण, देवाश्व इत्यादि एकशेंसाठांहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे आंगिरस, बार्हस्पत्य आणि भारद्वाज असे तीन प्रवर आहेत.

२. **गर्गांचे**—गर्ग, सांभरायण, सखिनी इत्यादि पन्नासाहून अधिक पोटभेद. त्यांचे आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, शैन्य आणि गार्ग्य, असे पांच; किंवा आंगिरस, शैन्य, गार्ग्य असे तीन; अथवा भारद्वाज, गार्ग्य आणि शैन्य असे तीन प्रवर, आणि गर्गांच्या पोटभेदाचे आंगिरस, तैत्तिरि, कापिभुव हे तीन प्रवर होत.

३. **ऋक्षांचे**—ऋक्ष, रौक्षायण, कपिल इत्यादि नवांहून अधिक पोटभेद. त्यांचे आंगिरस, वांदन, मातवचन बार्हस्पत्य, भारद्वाज, असे पांच किंवा आंगिरस, वांदन, मातवचस असे तीन प्रवर आहेत.

४. **कपींचे**—कपि, स्वस्तितरि, दंडि इत्यादि पंचवीसांहून अधिक भेद आहेत. त्यांचे आंगिरस, आमहय्य, औरुक्षय्य असे तीन प्रवर आहेत. आंगिरस, आमहीयव, औरुक्षयस असा आश्वलायनसूत्राचा पाठ आहे.

५. **आत्मभुवांचे**—आंगिरस, भारद्वाज, बार्हस्पत्य, वर आणि आत्मभुव असे पांच प्रवर आहेत.

ह्या सर्व भारद्वाजांगिरसांचा परस्पर विवाह होत नाहीं. गोत्र एक असून प्रायः द्वित्रिप्रवरसाम्यहि येतें. ऋक्षापैकीं कपिलांचा विश्वामित्रांशींहि विवाह होत नाहीं.

५ **आंगिरा आंगिरस केवलांगिरस यांचे भेद ६.**

१ हरित, २ कुत्स, ३ कण्व, ४ रथीतर, ५ विष्णुवृद्ध, ६ मुद्गल.

१ **हरितांचे**—हरित, सौभग, नैयगव इत्यादि बाविसाहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे आंगिरस, आंबरीष, आणि यौवनाश्व असे तीन; किंवा मांधाता, आंबरीष आणि यौवनाश्व असे तीन प्रवर आहेत.

२. **कुत्सांचे**—आंगिरस, मांधाता कौत्स असे तीन प्रवर आहेत.

३. **कण्वांचे**—कण्व, औपमर्कट, बाष्कलायन इत्यादि एकविसांहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे आंगिरस, आजमीढ, आणि कण्व असे तीन,

---

टीप—हरीत व कुत्स ह्यांचे प्रवर एकच आहेत असें आश्वलायन म्हणतो.

किंवा आंगिरस, घोर आणि कण्व असे तीन प्रवर आहेत.

४. **रथीतरांचे**-रथीतर, हस्तिद, नेतरक्षि इत्यादि चौदांहून अधिक भेद आहेत. त्यांचे आंगिरस, वैरूप, रथीतर असे तीन; किंवा आंगिरस, वैरूप, पार्षदश्व, असे तीन; किंवा अष्टादंष्ट्र, पार्षदश्व, वैरूप असे तीन प्रवर आहेत.

५. **विष्णुवृद्धांचे**-विष्णुवृद्ध, शठ, मरण इत्यादि पंचविसांहून अधिक भेद. त्यांचे आंगिरस, पौरुकुत्स, त्रासदस्यव असे तीन प्रवर आहेत.

६. **मुद्गलांचे**-मुद्गल, सात्यमुग्रि, हिरण्यस्तंबि इत्यादि अठराहून अधिक पोटभेद; त्यांचे आंगिरस, भार्म्याश्व, मौद्गल्य असे तीन किंवा तार्क्ष्य, भार्म्याश्व, मौद्गल्य असे तीन; अथवा आंगिरस, तार्क्ष्य, मौद्गल्य असे तीन प्रवर आहेत.

ह्या सहा केवलांगिरसांचा आपआपल्या पोटभेदांशीं मात्र विवाह होत नाहीं, परस्परांशीं आणि पूर्वींच्या सर्वांशीं होतो. हरित व कुत्स यांचा मात्र परस्पर विवाह होत नाहीं, कारण पाक्षिक द्विप्रवरसाम्य येते. आश्वलायनाच्या मतानें तर ह्या दोघांचे प्रवर एकच आहेत.

### ६ अत्रि यांचे भेद १०

१ अत्रि, २ गविष्ठिर, ३ वाद्भुतक, ४ मुद्गल, ५ अतिथि, ६ वामरथ्य ७ सुमंगल, ८ बीजवाप, ९ धनंजय, १० वालेय.

१. **अत्रींचेः**--अत्रि, भूरि, छांदि इत्यादि चवऱ्याण्णवाहून अधिक पोटभेद. त्यांचे आत्रेय, आर्चनानस, श्यावाश्व असे तीन प्रवर आहेत.

२. **गविष्ठिरांचेः**--गविष्ठिर, दक्षि, भलंदन, इत्यादि चोवीसाहून अधिक पोटभेद. त्यांचे आत्रेय, आर्चनानस, गविष्ठिर असे तीन; किंवा आत्रेय, गाविष्ठिर, पौर्वातिथ असे तीन प्रवर आहेत.

३. **वाद्भुतकांचेः**--आत्रेय, अर्चनानस, वाद्भुतक असे तीन प्रवर आहेत.

४. **मुद्गलांचेः**-मुद्गल, शालिसंधि, अर्णव इत्यादि दहांहून अधिक पोटभेद. त्यांचे आत्रेय, अर्चनानस, पौर्वातिथ असे तीन प्रवर आहेत.

५. **अतिथींचेः**--आत्रेय, अर्चनानस, अतिथि असे तीन; किंवा आत्रेय, आर्चनानस, गाविष्ठिर असे तीन प्रवर आहेत.

६. **वामरथ्यांचेः**- आत्रेय, अर्चनानस, अतिथ असे तीन; किंवा आत्रेय, अर्चनानस, गाविष्ठिर असे तीन प्रवर आहेत.

७. **सुमंगलांचेः**- अत्रि, सुमंगल, श्यावाश्व असे तीन; किंवा अतिथि व वामरथ्य ह्यांच्यापैकीं कोणता तरी एक प्रवर समजावा.

८. **बिजवापांचेः**-आत्रेय, अर्चनानस, आतिथ असे तीन, किंवा आत्रेय, अर्चनानस, गाविष्ठिर असे तीन प्रवर आहेत.

९. **धनंजयांचेः**- आत्रेय, अर्चनानस, धानंजय असे तीन प्रवर आहेत.

१०. **वालेयांचेः**-- वालेय, कौंद्रेय; शौभ्रेय; वामरथ्य इत्यादि पोटभेद आहेत. हे अत्रीचे पुत्रिकापुत्र होत. त्यांचे आत्रेय, वामरथ्य, पौत्रीक असे तीन प्रवर आहेत. अत्रींचा परस्परविवाह होत नाहीं; इतर सर्वांशीं होतो. वालेयादिक पुत्रिकापुत्रांचा वसिष्ठ व विश्वामित्र गोत्रांशींहि विवाह होत नाहीं.

**७ विश्वामित्र यांचे पोटभेद २१.**

१ कुशिक, २ लोहित, ३ रौक्षक, ४कामकायन ५ अज, ६ कत, ७ धनंजय, ८अघमर्षण, ९पूरण, १० इंद्रकौशिक ११ आस्मरथ्य,१२ साहुल, १३ गाथिन, १४ वैणव, १५ हिरण्यरेतस्, १६ सुवर्णरेत, १७ कपोतरेतस, १८ शालंकायन, १९घृतकौशिक, २० कथक, २१ रौहिण.

१. **कुशिकांचे**-- कुशिक, पर्णजंघ, वारक्य इत्यादि सत्तराहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे विश्वामित्र, देवरात, औदल असे तीन प्रवर आहेत.

२. **लोहिताचे**-लोहित, कुडक्य, चाक्रवर्णायन इत्यादि पांचांहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे वैश्वामित्र, अष्टक, लौहित असे तीन; किंवा वैश्वामित्र, माधुच्छंदस, अष्टक असे तीन; किंवा विश्वामित्र आणि अष्टक असे दोनच प्रवर आहेत. लोहितांनाच रोहित असेंहि म्हणतात.

३. **रौक्षकांचे**-विश्वामित्र, गाथिन, रवण असे तीन; किंवा विश्वामित्र, रौक्षक, रैवण असे तीन प्रवर, यांनाच रेवण असेंहि म्हणतात.

४. **कामकायनांचे**-कामकायन, देवश्रवस, देवतरस इत्यादि पांचांपेक्षां अधिक पोटभेद आहेत. त्यांचे विश्वामित्र, देवश्रवस, दैवरतस, असे तीन प्रवर आहेत. यांना श्रौमत असेंहि म्हणतात.

---

१ टीप --ह्या मुलीला जो पुत्र होईल तो माझा पुत्र होईल असा करार करून जर कन्यादान केलें असेल तर तिला झालेला पुत्र तिच्या बापाचा पुत्र होतो. त्याला पुत्रिकापुत्र म्हणतात.

५. **अजांचे**-वैश्वामित्र, माधुच्छंदस आणि अज असे तीन प्रवर आहेत.

६. **कतांचे**-कत, औदुंबरी, शिशिरि इत्यादि विसांहून अधिक पोट-भेद त्यांचे वैश्वामित्र, कात्य आणि आत्कील असे तीन प्रवर.

७. **धनंजयांचे**-धनंजय, पार्थिव, बंधुल इत्यादि सातांहून अधिक पोटभेद. त्यांचे वैश्वामित्र, मांधुछंदस, धानंजय्य असे तीन, किंवा वैश्वामित्र, माधुच्छंदस, अघमर्षण, असे तीन प्रवर आहेत.

८. **अघमर्षणांचे**-वैश्वामित्र, अघमर्षण, कौशिक असे तीन प्रवर.

९. **पूरणांचे**-वैश्वामित्र व पूरण असे दोन; किंवा वैश्वामित्र, देवरात, पौरण असे तीन प्रवर.

१०. **इंद्रकौशिकांचे**-वैश्वामित्र व इंद्रकौशिक असे दोन प्रवर.

११. **आश्मरथ्यांचे**-वैश्वामित्र, आश्मरथ्य व वाधूळ असे तीन प्रवर.

१२. **साहुलांचे**-वैश्वामित्र, साहुल आणि वाधूल असे तीन प्रवर.

१३. **गाथिनांचे**-वैश्वामित्र, गाथिन, रैवण असे तीन; किंवा वैश्वामित्र, गाथिन, वेणुव असे तीन; ह्यांसच रेणव किंवा उदवेणव असेंहि म्हणतात.

१४. **वैणवांचे**-वैश्वामित्र, गाथिन, वैणव असे तीन प्रवर.

१५. **हिरण्यरेतसांचे**-वैश्वामित्र आणि हिरण्यरेतस असे दोन प्रवर.

१६. **सुवर्णरेतसांचे**-वैश्वामित्र आणि सुवर्णरेतस असे दोन प्रवर.

१७. **कपोतरेतसांचे**-वैश्वामित्र आणि कपोतरेतस असे दोन प्रवर.

१८ **शालंकायनांचे**-वैश्वामित्र, शालंकायन आणि कौशिक असे तीन प्रवर ह्यानांच कौशिक किंवा जहुव असेंहि म्हणतात.

१९. **घृतकौशिकांचे**-विश्वामित्र आणि घृतकौशिक असे दोन प्रवर.

२०. **कथकांचे**—विश्वामित्र आणि कथक असे दोन प्रवर.

२१. **रौहिणांचे**-विश्वामित्र माधुच्छंदस, रौहिण, असे तीन प्रवर. ह्या सर्व विश्वामित्र गणांचा विवाह होत नाहीं. कारण गोत्र एक असून प्रवरहि समान आहेत. कौशिक आणि पुढें द्विगोत्रांत असलेले देवरात ह्यांचाहि प्रवरसाम्य असल्यामुळें विवाह होत नाहीं. तसाच कुशिकाचा जामदग्नयाशीं,

धनंजयांचा विश्वामित्र व अत्रीशीं, आणि कतांचा विश्वामित्र व भरद्वाज-गोत्रांशीं विवाह होत नाहीं.

### ८ कश्यप यांचे भेद ४.

१ कश्यप, २ निध्रुव, ३ रेभ, ४ शंडिल.

१. **कश्यपांचे**—काश्यप, अवत्सार आणि असित असे तीन प्रवर आहेत.

२. **निध्रुवांचे**—निध्रुल, अष्टांगिरस इत्यादि एकशेंचाळिसाहून अधिक पोटभेद आहेत. त्यांचे काश्यप, अवत्सार, निध्रुव असे तीन प्रवर आहेत.

३. **रेभांचे**--काश्यप, अवत्सार, रैभ्य असे तीन प्रवर आहेत.

४. **शंडिलांचे**—शांडिल, कोहल, उदमेध इत्यादि साठांपेक्षां अधिक पोटभेद आहेत. त्यांचे काश्यप, अवत्सार, शांडिल्य असे तीन; किंवा काश्यप, अवत्सार, देवल असे तीन; किंवा काश्यप, अवत्सार, असित असे तीन; काश्यप, देवल, असित असे तीन; किंवा देवल असित असे दोनच प्रवर समजावे.

कश्यपांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, गोत्र एक असून प्रवरहि एकच आहेत.

### ९ वशिष्ठ यांचे भेद ४.

१ वसिष्ठ, २ कुंडिन, ३ उपमन्यु, ४ पराशर.

१. **वसिष्ठांचे**—वसिष्ठ, वेतालकवि, रक इत्यादि साठांहून अधिक भेद आहेत. त्यांचे वासिष्ठ, इंद्रप्रमद, अभरद्वसु, असे तीन किंवा वासिष्ठ असा एकच प्रवर आहे.

२ **कुंडिनांचे**—कुंडिन लोहितायन गुग्गुलि इत्यादि पंचविसाहून अधिक पोटभेद, त्यांचे वसिष्ठ, मैत्रावरूण, कौंडिन्य असे तीन प्रवर आहेत.

३. **उपमन्यूचे**—उपमन्यु, औदलि, मांडलेखि, इत्यादि सत्तराहून अधिक पोटभेद, त्यांचे वासिष्ठ, इंद्रप्रमद, आभरद्वसु, असे तीन; किंवा वासिष्ठ इंद्रप्रमद आणि आभद्वसव्य असे तीन; किवा वासिष्ठ, आभद्वसु, इंद्रप्रमद किंवा आभद्वसु, वसिष्ठ आणि इंद्रपदअसे तीन प्रवर समजावे.

४. **पराशरांचे**—पराशर, कांडूशय, वाजि इत्यादि सत्तेचाळीसांपेक्षां

अधिक पोटभेद. त्यांचे वासिष्ठ, शावत्य, पाराशर्य असे तीन प्रवर.

वसिष्ठांचा परस्पर विवाह होत नाहीं.

## अगस्त्य यांचे भेद १०.

१ इध्मवाह, २ सांभवाह, ३ सोमवाह, ४ यज्ञवाह, ५ दर्भवाह, ६ सारवाह, ७ अगस्ति, ८ पूर्णमास, ९ हिमोदक, १० पाणिक.

१. **इध्मवाहांचे**—इध्मवाह, विशालाद्य, स्फालायन इत्यादि पन्नासाहून अधिक पोटभेद. त्यांचे आगस्त्य, दार्ढ्यच्युत, इध्मवाह असे तीन; किंवा आगस्त्य असा एकच प्रवर समजावा.

२. **सांभवाहांचे**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सांभवाह असे तीन प्रवर.

३. **सोमवाहांचे**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सोमवाह असे तीन.

•४. **यज्ञवाहांचे**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, यज्ञवाह असे तीन.

५. **दर्भवाहांचे**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, दर्भवाह असे तीन.

६. **सारवाहांचे**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सारवाह असे तीन.

७. **अगस्तींचे**—आगस्त्य, माहेंद्र, मायोभव असे तीन प्रवर.

८. **पूर्णमासांचे**—आगस्त्य, पौर्णमास, पारण असे तीन प्रवर.

९. **हिमोदकांचे**—आगस्त्य, हैमवदर्चि, हैमोदक असे तीन प्रवर.

१०. **पाणिकांचे**—आगस्त्य, पैनायक, पाणिक असे तीन प्रवर.

अगस्त्यांचा परस्पर विवाह होत नाहीं. गोत्र एक असून प्रवरहि समान आहेत.

## द्विगोत्र पोटभेद ९

१. शौंगशशिरि, २ संस्कृति, ३ लौगाक्षि, ४ देवरात, ५ धनंजय, ६ जातुकर्ण्य, ७ वामरथ्य, ८ कपिल, ९ कत.

---

१ टीपः—दोन गोत्रापासून ज्यांची उत्पत्ति झाली आहे तो व त्याची संतति द्विगोत्र होतात. जसे भरद्वाज गोत्रांतील शृंगऋषीपासून विश्वामित्र गोत्रांतील शिशिरऋषीच्या भार्येच्या ठिकाणीं पुत्र झाला त्याला दोनहि गोत्रांचे दर्शक शौंगशशिरि असें नांव ठेविलें. त्याची संतति शौंगशशिरि ह्या नांवानेच प्रसिद्ध झाली. म्हणून हा गोत्रप्रवर्तक झाला. त्याचप्रमाणें सर्व द्विगोत्रांचा

१ शौंगशैशिरियांचे–आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, शौंग आणि शशिर असे पांच. किंवा आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज. कात्य, आत्कील असे पांच, अथवा आंगिरस, कात्य आत्कील असे तीन; किंवा भारद्वाज, कात्य आत्कील असे तीन प्रवर समजावें.

यांचा सर्व भारद्वाजांशीं व सर्व विश्वामित्रांशीं विवाह होत नाहीं.

२ संकृतींचे–संकृति, पूतिमाष, तंडि इत्यादि अठ्ठाविसांपेक्षां अधिक भेद, त्यांचे आंगिरस, गौरिवीति, सांकृत्य असे तीन; किंवा शाक्त्य, सांकृत्य गौरवीति असे तीन प्रवर आहेत. याचा आपल्या पोटभेदाशीं, वसिष्ठांशीं आणि अहर्वसिष्ठसंज्ञक लौगाक्षि पुढें सांगावयाचे आहेत त्यांच्याशींहि विवाह होत नाहीं. केवळ आंगिरसांशीं होतो.

३. लौगाक्षियांचे–लौकाक्षि, दार्भायण इत्यादि अडतिसांहून अधिक पोटभेद. त्यांचे काश्यप, अवत्सार आणि वासिष्ठ असे तीन; किंवा काश्यप, अवत्सार, असित हे तीन प्रवर.

हे दिवसा वसिष्ठ आणि रात्रीं काश्यप आहेत, म्हणजे त्यांनी दिवसा कोणतेंहि कर्म करणें तें आपण वासिष्ठ गोत्री आहों असें समजून आणि रात्रीं काश्यप गोत्री आहों असें समजून करावें

ह्यांचा काश्यप, वासिष्ठ आणि संकृति ह्या गोत्रांशीं विवाह होत नाहीं. ह्यांना अहर्वसिष्ठ म्हणतात.

---

उपपत्ति समजावी. अशा द्विगोत्रांचे प्रवर कोणते व किती समजावे ह्याविषयीं आश्वलायन श्रौत सूत्रांत असें सांगितलें आहे.

तेषामुभयतः प्रवृणीत एकमितरतो द्वावितरतः द्वौ वेतरतस्त्रीनितरतः नहि चतुर्णां प्रवरोऽस्ति न पंचानामतिप्रवरणम् ॥ आ. श्रौ. सू. अ. १२.

दोन गोत्रांपासून जेव्हां तिसरें गोत्र उत्पन्न होतें तेव्हां एका गोत्रांतून एक आणि एकांतून दोन असें घेऊन तीन प्रवर मानावे. किंवा एकांतून दोन व एकांतून तीन घेऊन पांच प्रवर मानावे. चार प्रवर मानूं नयेत. असा निषेध आहे. म्हणून दोनहि गोत्रांतून दोन दोन असे सारखे प्रवर घेतां येत नाहींत, तसेंच पांचांपेक्षां अधिक प्रवर मानण्यास निषेध आहे. म्हणून प्रत्येक गोत्रांतून तीनपेक्षां अधिक प्रवर घेतां येत नाहींत.

४ देवरातांचे-विश्वामित्र, देवरात आणि औदल असे तीन प्रवर. ह्यांचा जामदग्न्य व विश्वामित्र गोत्रांशीं विवाह होत नाहीं.

५. धनंजयांचे-वैश्वामित्र, माधुच्छंदस, धानंजय्य असे तीन प्रवर. ह्यांचा विश्वामित्र व अत्रीशीं विवाह होत नाहीं.

६. जातुकर्ण्यांचे-वासिष्ठ, आत्रेय आणि जातुकर्ण्य असे तीन प्रवर. ह्यांचा वसिष्ठ व अत्रीशीं विवाह होत नाहीं.

७. वामरथ्यांचे-आत्रेय, वामरथ्य, पौत्रिक असे तीन प्रवर. ह्यांचा वसिष्ठ, विश्वामित्र व अत्रि ह्या तीनहि गोत्रांशीं विवाह होत नाहीं.

८. कपिलांचे-आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, वांदन व मातवचस असे पांच प्रवर.

ह्यांचा विश्वामित्र व भारद्वाज गोत्रांशीं विवाह होत नाहीं.

९. कतांचे-वैश्वामित्र, कात्य आणि आत्कील असे तीन प्रवर.

ह्यांचा विश्वामित्र व भारद्वाज गोत्रांशीं विवाह होत नाहीं. ह्याच न्यायानें परगोत्रांतील झालेले व होणारे दत्तक द्विगोत्र समजावे. अर्थात जनक व पालक ह्या दोनहि गोत्रांशीं त्यांचा व त्यांच्या संततीचा विवाह होऊं नये. अनेक पिढ्यानंतरहि दत्तकाचें द्विगोत्रत्व नष्ट होत नाहीं.

याप्रमाणें विवाहाला आवश्यक असणारा गोत्रप्रवरनिर्णय संक्षेपानें सांगितला. सविस्तर पाहिजे असल्यास महानिबंधांत पहावा.

## घटिताची उपपत्ति

वधूवरांची विवाहयोग्यता ठरविणें हा अत्यंत बिकट शास्त्रीय प्रश्न आहे. पण तो सुटल्याशिवाय विवाह सुखपर्यवसायी होणें शक्य नाहीं. विवाह सुखपर्यवसायी होणें म्हणजे केवळ वधूवरांनीं सुखासमाधानानें आयुष्य घालविणें एवढाच त्याचा अर्थ नसून वधुवरांची संततिहि त्यांच्यापेक्षां सर्व-दृष्ट्या सरस झाली पाहिजे. त्यांच्या स्वभावाप्रमाणें त्यांची शरीरप्रकृतिहि पर-स्परांना अनुकूल असावयास पाहिजे. रक्त, शरीर, शरीरधर्म, स्वभाव, खोडी आणि प्रकृति ह्या सर्वच गोष्टी परस्परांशीं जुळत्या असतील तरच विवाहाचें उद्दिष्ट साध्य होऊन वधूवरांच्या संसाराचें तारु सुखासमाधानानें पलतीरीं जाणें शक्य आहे.

पण अशा प्रकारें वधूवरांच्या गुणमापनाला साधन काय असणार ? ज्यांमध्यें वधूवरांच्या स्वभावगुणांचें यथार्थ प्रतिबिम्ब सांपडेल असें साधन उपलब्ध झाल्याशिवाय हा प्रश्न केव्हांहि सुटणार नाहीं. परंतु तसें साधन ज्योतिषाशिवाय अन्यत्र उपलब्ध होणें शक्य नसल्यामुळें घटित पाहण्याचा मार्ग आपल्या पूर्वजांनीं पत्करला असण्याचा संभव आहे. रक्तशुद्धीकरतां गोत्र-प्रवर पाहण्याचा उपाय आपण शोधून काढला आणि त्याची उपयुक्तताहि आपणांस मान्य आहे.

वैद्यकांत आपण नाडीचे वात, पित्त आणि कफ असे तीन प्रकार मानतो. प्रायः ज्योतिषांतहि नक्षत्रांच्या चरणावरून तसेच प्रकार कल्पिले आहेत. समाननाडीच्या स्त्रीपुरुषांच्या संयोगापासून संतति उत्पन्न होण्याचा संभव नसतो आणि झाल्यास संततीवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं हेंहि तितकेंच प्रसिद्ध आहे. आणि या दृष्टीनें एकनाड आली कीं विवाह करूं नये, केल्यास पति मृत्यु पावतो असें ज्योतिषांत फल सांगितलें असावें.

गणासंबंधींहि असेंच दिसतें. सत्त्व, रज आणि तम अशा तीन प्रकृतीवर देव, मनुष्य आणि राक्षस असे गण बसविण्यांत आले. यामध्यें वधूचा वर-चढपणा दाखविणारा गण असूं नये असें साधारणपणें पहाण्यांत येते. यांतीलहि तात्पर्य उघड आहे.

कुटाचा विचार राशिस्वामींच्या शत्रुमित्रत्वावर बसविला आहे. त्यावरून शरीर व स्वभाव यांचें आनुकूल्य व प्रतिकूल्य आजमावणें सशास्त्र ठरतें तोच प्रकार ग्रहमत्रीचाहि आहे.

स्वभावानुकूल्याकरतांच वर्ण, योनि,नक्षत्र आणि वश्य पहाण्यांत येतात. आणि शरीरधर्माची अनुकूलता नाडी, गण, कूट आणि ग्रह यांच्यावरून ठरविण्यांत येते. आणि त्यांतहि साधारणतः निम्याच्यावर अनुकूलता असली तर विवाहयोग्यता मान्य करण्यांत येते.

अदृश्य गोष्टींविषयीं अनुमान करण्याची कोणचीहि पद्धति घेतली तरी ती सदोष, सापवाद आणि शंका काढल्यास वाव असणारी अशी असतेच. तसा या पद्धतींतहि वाव आहे. पण साधारण मानानें दिशा दाखविण्यापुरतेंहि असे मार्ग उपयोगी पडले तरी ते पुरेसे होतात.

## छत्तीस गुण

१ वर्ण, २ वश्य, ३ नक्षत्र, ४ योनि, ५ ग्रह, ६ गण, ७ कूट, आणि ८ नाडी. या आठां-वरून सर्व प्रकार चांगले जमल्यास एकोत्तरवृद्धीनें छत्तीस गुण येतात. अठरापेक्षां अधिक गुण जमल्यास विवाह करण्याला हरकत नाहीं, अठरा-पासून छत्तीसपर्यंत जितके अधिक गुण येतील तितके चांगलेच; मात्र उभयतांची एक नाडी व मनुष्यगणाच्या वरास राक्षसगणाची कन्या असूं नये. वधूवरांचें जन्मनक्षत्र, जन्मराशि व जन्मलग्न ह्यावरून घटिताचा विचार करावयाचा असतो, म्हणून जन्मसमय ज्योतिःशास्त्राच्या आधारें स्पष्ट करून पत्रिका केलेली असेल तरच घटित पहावें. जन्मवेळेच्या खरेंपणाबद्दल खात्री नसेल तर घटितांचा कांहीं उपयोग नाहीं. कारण, घटित पहाणें हें मूळचेंच ऐच्छिक आहे. सापिंड्य, गोत्रप्रवर ह्यांचा विचार करण्याबद्दल जसें धर्म-शास्त्रांत सांगितलें आहे तसें घटिताबद्दल कांहींच सांगितलें नाहीं.

### राशींचे स्वामी, वर्ण व जाति

| राशि | स्वामी | वर्ण | जाति |
|---|---|---|---|
| मेष | मंगळ | क्षत्रि. | वन. |
| वृषभ | शुक्र | वैश्य | वन |
| मिथुन | बुध | शूद्र | मनु. |
| कर्क | चंद्र | ब्राह्मण | जळ |
| सिंह | रवि | क्ष. | वन. |
| कन्या | बुध | वै. | मनु. |
| तुळा | शुक्र | शूद्र | मनु. |
| वृश्चिक | मंगळ | ब्रा. | वन. |
| धन | गुरु | क्ष. | मनु. |
| मकर | शनि | वै. | जळ. |
| कुंभ | शनि | शूद्र | मनु. |
| मीन | गुरु | ब्राह्मण | जळ. |

### १ वर्णगुण

वधूवरांचा वर्ण एक किंवा वधूपेक्षां वराचा वर्ण वरचा असेल तर एक गुण समजावा. ह्याच्या उलट असेल तर शून्य गुण.

### २ वश्यगुण

मनुष्य राशीला जलचर राशि भक्ष्य आहेत, सिंहाशिवाय इतर सर्व राशी मनुष्याला वश्य आहेत, सिंहाला वृश्चिकाशिवाय सर्व वश्य आहेत,

वृश्चिक हा सिंहाचा शत्रु आहे, मनुष्य राशीला जलचर व सिंह हे शत्रु आहेत. दोघांच्याहि राशि एकाच जातीच्या असतील तर मित्रत्व समजावें. वधूवरांच्या राशींचा परस्पर मित्रत्वसंबंध असेल तर गुण दोन. शत्रु व वश्य असा संबंध असेल तर गुण एक. वश्य व भक्ष्य असा असेल तर अर्धा गुण आणि शत्रु व भक्ष्य असा संबंध असेल तर गुण शून्य.

### ३ योनीचे-जातीचे गुण

| नक्षत्रें | | जाति |
|---|---|---|
| अश्विनी | शततारका | अश्व |
| भरणी | रेवती | हत्ती |
| कृत्तिका | पुष्य | मेंढा |
| रोहिणी | मृग | सर्प |
| आर्द्रा | मूळ | कुत्रा |
| पुनर्वसु | आश्लेषा | मार्जार |
| मघा | पूर्वाफ. | उंदीर |
| उत्त. फ. | उत्तराभा. | गो |
| हस्त | स्वाति | महिष |
| चित्रा | विशाखा | व्याघ्र |
| अनुराधा | ज्येष्ठा | हरिण |
| पूर्वाषाढा | श्रवण | वानर |
| उत्तराषाढा | अभिजित | मुंगुस |
| धनिष्ठा | पूर्वाभाद्र. | सिंह |

बाजूच्या कोष्टकांत दोन दोन नक्षत्रांची एक अशा चौदा जाति दाखविल्या आहेत, त्याचप्रमाणें वधूवरांच्या नक्षत्रांची एक जाति असेल तर अतिमैत्री समजावी. सिंह—हत्ती, महिष-घोडा, उंदीर—मांजर, कुत्रा-हरिण, वानर-मेंढा, मुंगुस-सर्प, आणि गाई—वाघ ह्यांचे जातिवैर आहे. बाकी मित्र,शत्रु किंवा उदासीन हें लोक-व्यवहारावरून जाणावें.

जसें गाय-महिष हे परस्पर मित्र, हरिण-वाघ हे शत्रु, आणि कुत्रा व सर्प हे परस्पर उदासीन इत्यादि परस्पर अतिमित्र असतील तर गुण ४,मित्र असतील तर गुण ३, उदासीन असतील तर गुण २, शत्रु असतील तर गुण १ आणि जातिवैर असेल तर गुण शून्य.

### ४ नक्षत्रगुण.

वधूच्या जन्मनक्षत्रापासून वराचें व वराच्या जन्मनक्षत्रापासून वधूचें जन्मनक्षत्र मोजून जी संख्या येईल तिला पृथक् पृथक् नवांनीं भागावें. ३।५।७ बाकी राहील तर अशुभ. याशिवाय कोणताहि अंक शेष राहिला तर चांगलें.

दोनहि बाजूनें ३।५।७ ह्यापैकीं कोणताच अंक शेष न राहील तर गुण तीन. एकाकडून ३।५।७ पैकीं कोणता तरी अंक राहिला आणि दुसरीकडून इतर अंक शेष राहिला तर गुण दीड. आणि दोन्हीकडूनहि ३।५।७ ह्यापकींच कोणताहि अंक शेष राहिला तर गुण शून्य.

५ ग्रहांचे गुण.

| ग्रह | मित्र | शत्रू | सम |
|---|---|---|---|
| र. | चं.मं.गु. | शु. श. | बु. |
| चं. | र. बु. | ० | मं.गु.शु.श |
| मं. | र.चं.गु. | बु. | शु. श. |
| बु. | र. शु. | चं. | मं. गु. श |
| गु. | र.चं.मं. | बु. शु. | श. |
| शु. | बु.श. | चं.र. | मं. गु. |
| श. | बु.शु. | र.चं.मं | गु. |

बाजूच्या कोष्टकांत दाखविल्याप्रमाणें वधूवरांच्या राशीचा स्वामी एकच असेल किंवा ते दोघे परस्पर मित्र असतील तर गुण ५, एक मित्र आणि दुसरा सम असेल तर गुण४, दोघेही परस्पर समान असतील तर गुण६, एक मित्र व दुसरा शत्रु असेल तर गुण १, एक सम व दुसरा शत्रु असेल तर गुण अर्धा आणि दोघे परस्पर शत्रू असतील तर गुण शून्य.

६ गण व त्यांचे गुण.

| देवगण | मनुष्यगण | राक्षसगण |
|---|---|---|
| अश्विनी | भरणी | कृत्तिका |
| मृग | रोहिणी | आश्लेषा |
| पुनर्वसु | आर्द्रा | मघा |
| पुष्य | पूर्वाफाल्गुनी | चित्रा |
| हस्त | उत्तराफा० | विशाखा |
| स्वाती | पूर्वाषाढा | ज्येष्ठा |
| अनुराधा | उत्तराषाढा | मूळ |
| श्रवण | पूर्वाभाद्र० | धनिष्ठा |
| रेवती | उत्तराभाद्र० | शततारका |

वधूवरांचा गण एक असेल किंवा वधूचा मनुष्य आणि वराचा देवगण असेल तर गुण ६, वधूचा देवगण व वराचा मनुष्यगण असेल तर गुण ५, वधूचा देव व वराचा राक्षसगण असेल तर गुण १, ह्याशिवाय इतर सर्व प्रकारांत गुण शून्य. मनुष्यगणाच्या वराचा राक्षसगणाच्या वधूशीं विवाह करीत नाहींत.

## मनुष्य राक्षसगणाला अपवाद.

१. सत्कूट असून अठरांचे वर गुण असतील, तर मनुष्य-राक्षसगणाचा दोष नाहीं.

२. ग्रहमैत्री उत्तम असेल तर मनुष्यराक्षसगणाचा दोष नाहीं.

३. योनिशुद्धि असेल तर मनुष्यराक्षसगणाचा दोष नाहीं.

मात्र येथें नाडीभेद असलाच पाहिजे.

## ७ कूटाचा विचार व त्याचे गुण.

वधूच्या राशीपासून वराची व वराच्या राशीपापासून वधूची रास मोजावी. कोणाच्याहि राशीपासून दुसऱ्याची रास, सहावी किंवा आठवी येईल तर त्याला षडष्टक म्हणतात. दुसरी किंवा बारावी येईल तर द्विर्द्वादशक म्हणावें. आणि पांचवी किंवा नववी येईल तर नवपंचम म्हणावें. हीं तीनहि दुःकूटें होत.

एकापासून दुसऱ्याची तिसरी किंवा अकरावी, चवथी व दहावी किंवा परस्पर सातवी येईल तर ह्या तीनहि प्रकारच्या कूटांना सत्कूट म्हणतात.

दुःकूटाला अपवाद-पहिल्या तीन दुष्कूटांपैकीं ६।८ ह्या कूटांत आठवी येणारी रास मेषादि क्रमांत समसंख्येची वृषभ, कर्क वगैरे असेल तर दुष्कूट असूनहि सत्कूट समजावें. तसेंच सिंह आणि कन्या हें द्विर्द्वादशकहि सत्कूट समजावें. कोणतेंहि दुष्कूट असलें तरी त्या राशींचा स्वामी एक असेल किंवा परस्पर मित्र असतील तर तेंहि सत्कूट समजावें. सत्कूट असेल तर गुण ७, दुष्कूट असूनहि योनिमत्री व स्त्रीदूर असेल तर गुण ४, ह्या दोहोंतून एक असेल तर गुण १, एकहि नसल तर गुण शून्य. सत्कूट असून, नृदूर व योनिवर असेल तर गुण ६, नक्षत्र भिन्न असून राशि एक असेल तर गुण ५, नक्षत्रें भिन्न असून राशि एक आणि नक्षत्र एक असून चरण भिन्न असेल तर गुण ५, नक्षत्र भिन्न असून राशि एक आणि नक्षत्र एक असून चरण भिन्न असेल तर दोनहि प्रकारचें घटित उत्तम समजावें.

ह्या दोनहि प्रकारांत ग्रहमैत्री, गण, नाडी व नृदूरनांचा विचार करण्याचें कारण नाहीं. ह्या दोनहि उदाहरणांत केव्हां एक नाडी येते, केव्हां मनुष्यराक्षस असे गण येतात व केव्हां राशिस्वामींचें परस्पर शत्रुत्वहि येते. परंतु तें अशुभ न समजतां त्या त्या प्रकरणांत सांगितलेले त्याचे त्याचे पूर्ण गुण समजावेत.

## ८ नाडी व तिचे गुण.

| आद्यनाडी | मध्यनाडी | अंत्यनाडी | |
|---|---|---|---|
| अश्विनी | भरणी | कृत्तिका | वधुवरांचीं नाडी भिन्न |
| आर्द्रा | मृग | रोहिणी | असेल तर गुण ८, एक |
| पुनर्वसु | पुष्य | आश्लेषा | असेल तर गुण शून्य. |
| उत्तराफाल्गुनी | पूर्वाफा० | मघा | गोदेच्या दक्षिण देशां- |
| हस्त | चित्रा | स्वाती | त ब्राह्मणेतरांत आद्य- |
| ज्येष्ठा | अनुराधा | विशाखा | व अंत्यनाडी एक आली |
| मूळ | पूर्वाषाढा | उत्तराषाढा | तरी निषिद्ध मानीत |
| शततारका | धनिष्ठा | श्रवण | नाहींत. गण, कूट, व |
| पूर्वाभाद्रपदा | उत्तराभाद्रपदा | रेवती | नाडी यांचे पूर्ण गुण |

असल्यास इतर गुण पहाण्याची जरूर नाहीं.

## नाडीला अपवाद.

१. वधूवरांचीं नक्षत्रें एक नाडींत असून त्या दोन नक्षत्रांपकीं एका नक्षत्राचा प्रथमचरण व दुसऱ्या नक्षत्राचा चतुर्थ चरण असेल तरच, किंवा एका नक्षत्राचा दुसरा चरण असेल तरच नाडीदोष समजावा.

२. वधूवरांच्या नक्षत्रांपकीं एका नक्षत्राचा प्रथम चरण असून दुसऱ्या नक्षत्राचा दुसरा किंवा तिसरा चरण असेल तर एकनाडीदोष नाहीं असें समजावें.

---

**टीपः**–१वधूच्या नक्षत्रांवरून वराचें नक्षत्र दुसरें असेल तर त्याला **नृदूर म्हणावें.**

३. अथवा वधूवरांच्या नक्षत्रांपकीं एका नक्षत्राचा दुसरा चरण असून दुसऱ्या नक्षत्राचा प्रथम चरण किंवा चतुर्थ चरण असेल, तर एकनाडीचा दोष नाहीं असें समजावें.

४. नाडीवांचून गुण आणण्याचे जे सात प्रकार आहेत, ते उत्तम असतील तर एकनाडीचा दोष नाहीं असें समजावें.

५. अठराचे वर गुण असून सत्कूट असेल तरीहि एकनाडीचा दोष नाहीं.

### मृत्युषडष्टकाला अपवाद.

१. भिन्न नाडी असून वधूवरांच्या राशीची वश्यता असेल किंवा ताराशुद्धि असेल आणि १८ पेक्षां जास्त गुण असतील तर मृत्युषडष्टकाचा दोष नाहीं असें समजावें.

### मंगळ पहाणें




वधूच्या जन्मकुंडलीमध्यें बाजू दर्शविलेल्या प्रथम, चतुर्थ, सप्तम, अष्टम आणि द्वादश या स्थानीं मंगळ असेल तर नवऱ्याला अनिष्ट आहे.

### याला अपवाद

(१) वधूच्या कुंडलीमध्यें जी मंगळाचीं स्थानें सांगितलीं आहेत त्याच स्थानीं वराच्या कुंडलींत मंगळ शनि, राहु, किंवा केतु यांपैकीं कोणताहि पापग्रह असेल तर वधूच्या मंगळाचा दोष नाहीं. किंवा— (२) ३६ गुणांपकीं २७ पेक्षां जास्त गुण येत असतील तर मंगळाचा दोष नाहींसा होतो. ह्याशिवाय बरेच अपवाद आहेत ते खानापूरकरशास्त्रीकृत भौमविवेकांत पहावेत.

### मंगळ पहाण्याची चाल.

बृहज्जातक, सारावली इत्यादि जुन्या ग्रंथांत वधूच्या जन्मलग्नापासून

सप्तम व अष्टम ह्या स्थानाचा, पति व त्याचें आयुष्य ह्याच्याशी संबंध असल्यामुळें, त्या स्थानीं कोणताहि खलग्रह असणें घातुक आहे असें सांगितलें आहे. पण सध्यां इतर खलग्रहाचा विचार न करतां केवळ मंगळाचाच करतात व त्यांतहि १।४।१२ ह्या स्थानीं असलेला मंगळहि वर्ज्य मानतात. पण ह्याला जातकग्रंथांत आधार नाहीं. १।४।१२ ह्या स्थानीं असलेल्या मंगळाची सप्तमस्थानीं पूर्ण दृष्टि पडते, ती चांगली नाहीं ह्या कल्पनेनें हे सर्व प्रचारांत आलें असावें.

मंगळाची जन्मभूमि मालवदेश असल्यामुळें माळव्यामध्यें मंगळ पहाण्याची पद्धत आहे. पूर्वी आपल्या देशांत मुळींच मंगळ पहात नव्हते. पण अलीकडे ३०।३५ वर्षांत मंगळ पहाण्याची पद्धत सुरू झाली आहे.

## विशेष अपवाद.

एकनाड, मृत्युषडष्टक, मनुष्यराक्षसगण हे दोष असतील तर विवाह करूं नये असें सांगितलें आहे. परंतु त्याला कांहीं अपवाद आहेत. ते असल्यावर विवाह करण्यास हरकत नाहीं. ते अपवाद मागें दिले आहेत.

तसेंच अशा प्रसंगीं विवाह करणें अवश्यक असल्यास एक लक्ष मृत्युंजयाचा जप, शंकरावर अतिरुद्राभिषेक, प्रत्यक्ष गोप्रदान, सुवर्णदान, रौप्यदान, वस्त्रदान व अन्नदान हीं सर्व करून विवाह केला असतां सर्व दोषांचा परिहार होऊन शुभ फलप्राप्ति होईल.

असा हा ३६ गुणांचें घटित पहाण्याचा प्रकार आहे. हें जन्मनक्षत्रावरून पहावयाचें असतें. तें माहीत नसेल तर चालू नांवाच्या नक्षत्रावरून पहावें. मात्र एकाचें जन्मनक्षत्र व एकाचें नामनक्षत्र असें करूं नये.

## ग्रहांची अनुकूलता

वधूला गुरूचें आणि वराला रवीचें अनुकूल्य विवाहप्रसंगीं आवश्यक आहे. वधूच्या जन्मराशीपासून २।५।७।९।११ ह्या स्थानीं असलेला गुरू उत्तम, १।३।६।१० ह्या स्थानीं असलेला मध्यम आणि ४।८।१२ ह्या स्थानीं असलेला अशुभ. पण कर्क, धन आणि मीन ह्यांतून कोणत्याहि राशीला असलेला गुरू ४।८।१२ ह्यांपैकीं कोणत्याहि अशुभस्थानीं असला तरी तो चांगला मग १।३।६।१० ह्या स्थानीं असलेला चांगला हें काय सांगावयास हवें ?

वराच्या जन्मराशीपासून ३।६।१०।११ ह्या स्थानीं असलेला रवि उत्तम. आणि १।२।४।५।७।८।९।१२ ह्या स्थानां असेल तर अनिष्ट. पण जन्मराशीपासून ३।६।१०।११ ह्या स्थानीं असलेला रवि इष्ट होतो.

## विवाह मुहूर्त.

उदगयन आपूर्यमाणे पक्षे कल्याणे नक्षत्रे चौलकर्मोपनयनगोदानविवाहाः सार्वकालमेके विवाहम् । आ. गृ. १.

' उत्तरायण, शुक्लपक्ष आणि कल्याणकारक नक्षत्र, तिथि, योग, करण, अशा शुभसमयीं चौल, उपनयन, गोदान आणि विवाह हे संस्कार करावे; आणि कांहींच्या मतानें विवाह पाहिजे त्यावेळीं करावा असें आश्वलायनसूत्र आहे '

वैशाख, ज्येष्ठ, मार्गशीर्ष, माघ आणि फाल्गुन हे महिने, कृष्णत्रयोदशीपासून शुक्लप्रतिपदेपर्यंतच्या चार सोडून सर्व तिथि, परिघयोगाचें पूर्वार्ध, व्यतिपातवैधृतिशिवाय सर्व योग, भद्रेशिवाय करणें, रोहिणी, मृग, मघा, उत्तराफाल्गुनी, हस्त, स्वाती, अनुराधा, मूळ, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा आणि रेवती हीं अकरा नक्षत्रें, हीं विवाहाला उक्त नक्षत्रें आहेत.

" सार्वकालमेके विवाहम् ,चा अर्थ कोणत्याहि महिन्यांत योग्य दिवशीं असा करतात. हा पक्ष सरासरी लोकांत उपयोगांत आणीत नाहींत.

व्यंकोबाच्या गिरीवर केव्हांहि विवाह करतात. महाराष्ट्रांतहि अशी एकदोन स्थलें आहेत. त्याचाहि प्रसंगीं लोक उपयोग करतात.

अशा प्रकारें विवाहसंस्काराला अवश्य असणारी माहिती दिली आहे. त्याचा सर्वांना उपयोग होईल अशी आशा आहे. के. शिवरामशास्त्री गोरे यांनीं ' वैदिकविवाहपद्धति ' नांवाचें विवाहसंस्कारावरील पुस्तक चौदा वर्षांपूर्वीं प्रसिद्ध केलें होतें त्याचा मला हें पुस्तक तयार करतांना फार उपयोग झालेला आहे. त्यापूर्वीहि श्रीमंत सयाजीरावांच्या आश्रयानें ' विवाहविधिसार ' म्हणून एक पुस्तक सविस्तृत प्रसिद्ध झालेलें आहे पण तें मला वेळेवर मिळालें नाहीं.

माघ शु० १।१८४९ | **सिद्धेश्वरशास्त्री चित्राव**

# विवाह संस्कार



## वाग्दान ( वाङ्निश्चय ) प्रयोगः ।

**ग्रहीतारः**–(वरपित्रादिप्रहिताश्चत्वारोऽष्टौ वा प्रशस्तवेषाः पुरंध्रीभिर्मंगलगीततूर्यश्च कन्यागृहमेत्य शुभे सवस्त्रपीठासने प्राङ्मुखीं सालंकारां सुवेषां कन्यामुपवेश्य तद्धस्ते फलतांबूलादि दत्वा तत्पित्रादिपुरतः श्रीगणपत्यादिस्मरणपूर्वकं प्राङ्मुखाः प्रत्यङ्मुखा वा ) अमुकप्रवरान्वितामुकगोत्रोत्पन्नाय अमुकप्रपौत्राय अमुकपुत्राय अमुकनाम्ने वराय, अमुकप्रवरोपेताम् अमुकगोत्रोत्पन्नाम् अमुकप्रपौत्रीम् अमुकपौत्रीम् अमुकपुत्रीम् अमुकनाम्नीं कन्यां भार्यात्वाय वृणीमहे ( इति ब्रूयुः )

---

आठप्रकारच्या विवाहांतील मुख्य ब्राह्मविवाहांत वाग्दानविधि प्रथम करावा लागतो. वाग्दान ( वाच्+ दान ) म्हणजे कन्या व वर यांच्या पालकांनीं परस्परांना वचन देणें. ह्या विधीचा प्रकार गृह्यपरिशिष्टांत सांगितलेला असून सर्व शिष्ट लोकांत तो करण्याची चाल आहे, तो असा–ज्योतिषानें मुहूर्तग्रंथाच्या आधारें सांगितलेल्या विवाहनक्षत्रादिकांनीं युक्त अशा शुभमुहूर्तावर दोन, चार, आठ किंवा याहून अधिक पण समसंख्येचे, चांगला पोशाख धारण केलेले ब्राह्मण आणि तशाच व तितक्याच सवासिनी ह्यास वरपित्यानें किंवा वरानें कन्यापित्याच्या घरीं ' अनृक्षरा० (शेवटीं पहा) इत्यादि मंत्रांनीं पाठवावें. त्यांच्याबरोबर मंगलवाद्यें व मंगलगीतें होत असावींत. ही सर्व निघतेवेळीं शकून पाहून वराला घेऊन किंवा न घेतां जावें. सर्व कन्यापित्याच्या घरीं गेल्यावर, स्वागत झाल्यावर, वस्त्रालंकारानें भूषित अशा कन्येस चांगल्या वस्त्रयुक्त पाटावर पूर्वेकडे तोंड करून बसवावी. कन्येच्या हातांत विडानारळ देऊन कन्यापक्षीय मंडळींच्या समक्ष वरपक्षीयांनीं,

**दाता**—( भार्याज्ञातिबन्ध्वनुमतिं कृत्वा वदेत् ) वृणीध्वम्।
( एवं पुनर्द्विः प्रयुज्य चोच्चैस्त्रिर्वदेत् )प्रदास्यामि ।

( ततो वरपित्रादिर्गंधाक्षतवस्त्रयुग्म–भूषण–तांबूलपुष्पादिभिः कन्यां पूजयेत् । ततः कन्यादाता प्राङ्मुखः कन्यावामत उपविश्य आचमनं देशकालस्मरणं च कुर्यात् )

**संकल्पः**—करिष्यमाण–विवाहांगभूत–वाग्दानमहं करिष्ये । तदंगं गणपतिपूजनं वरुणपूजनं च करिष्ये ।
गणानां त्वा शौनको गृत्समदो गणपतिर्जगती गणपतिस्मरणे विनियोगः।

**गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।**
**ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम्।**

( इति गणपतिं पूजयेत् )

---

पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसून गणपत्यादि इष्टदेवतांचें स्मरण करून वराच्या गोत्रप्रवराचा उच्चार करून, हा अमक्याचा पणतु, अमक्याचा नातु आणि अमक्याचा पुत्र, अमुक नांवाचा, याची भार्या होण्याकरतां अमुक गोत्रप्रवरांत उत्पन्न झालेली, अमक्याची पणती, अमक्याची नात आणि अमक्याची कन्या हिला आम्हीं स्वीकारतों असें म्हणावें.

हें ऐकून नंतर कन्यापित्यानें आपली पत्नी, ज्ञाति व बांधव यांच्या संमतीनें 'स्वीकारा' असें म्हणावें. याप्रमाणें आणखी दोन वेळ वरपक्षीयांनीं ती मागावी व कन्यापित्यानें स्वीकारा असें म्हणावें. व मोठ्यांनीं 'देतों देतों, देतों,' असें तीन वेळ म्हणावें. नंतर वरपक्षीयांनीं हळदीकुंकू,गंध,अक्षत, साडी-चोळी, अलंकार, सुगंधि पुष्पें, शर्करादि भक्ष्यपदार्थ यांनीं पूजन करावें. नंतर

---

१ हे ब्रह्मणस्पते, गणांचा अधिपति, बुद्धिमानांतला बुद्धिमान,अत्यंत उत्कृष्ट अन्न खाणारा, श्रेष्ठांतला श्रेष्ठ, मंत्राधिपति अशा तुला आम्ही बोलावतों. आमची स्तवनें ऐकत येथें आसनावर बैस. ( ऋ. २. २३. १. )

मही द्यौरिति मंत्रस्य काण्वो मेधातिथिर्ऋषि द्यावापृथिवी गायत्री वरुणपूजने विनियोगः ।

**म॒ही द्यौः पृ॑थि॒वी च॑ न इ॒मं य॒ज्ञं मि॑मिक्षताम् । पि॒पृ॒तां नो॒ भरी॑माभिः ॥२॥** ( इति वरुणं पूजयेत् )

( स्वस्थाने कन्यापूजयितारमुपवेश्य स्वयं तत्प्राच्यां प्रत्यङ्मुख उपविश्य तं गंधतांबूलादिना पूजयेत् । स च दातारं पूजयेत् । )

ततो दाता आचारतो हरिद्राखंडं पंच दृढपूगफलानि च गंधाक्षतालंकृतानि गृहीत्वा ) अमुकप्रवरान्विताय अमुकगोत्राय अमुकप्रपौत्राय, अमुकपौत्राय अमुकपुत्राय अमुकनाम्ने वराय

अमुकप्रवरान्विताम् अमुकगोत्रोत्पन्नाम् अमुकप्रपौत्रीम् अमुकपौत्रीम् अमुकस्य मम पुत्रीम् अमुकनाम्नीम् इमां कन्यां ज्योतिर्विदादिष्टे शुभे मुहूर्ते दास्ये ( इति वाचा संप्रददे इति चोक्त्वा )

अव्यंगेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते ।
इमां कन्यां प्रदास्यामि देवाग्निद्विजसान्निधौ ॥३॥

इति वरपित्रादिवस्त्रप्रान्ते तानि पूगफलानि प्रक्षिप्य प्रतिष्ठा

---

कन्येच्या पित्यानें आपण प्राङ्मुख बसून कन्येला आपल्या डावे बाजूस बसवावी आणि देशकालाचें स्मरण करून ह्या माझ्या कन्येचा विवाह करणार त्याचें अंगभूत वाग्दान मी करतों असा संकल्प करावा. आरंभीं गणपतिपूजन करावें आणि कलशपूजनाची वहिवाट असल्यास तसेंहि करावें. मग आपण उठून आपल्या जागीं वरपक्षांतील मुख्य मनुष्यास बसवावा आणि आपण त्याच्यापुढें पश्चिमेस तोंड करून बसून त्याची गंध, फुलें, विडा इत्यादिकांनीं पूजा करावी. नंतर वरपक्षांतील मुख्यानेंहि त्याचप्रमाणें कन्यापित्याची पूजा करावी.

---

२ थोर द्युलोक आणि विस्तृत पृथ्वी या यज्ञावर पाऊस पाडण्याची इच्छा करोत. आणि पोषक द्रव्यांनीं आमचें पोषण करोत. ( ऋ. १.२२.१३ )

मंत्रेण , तदस्तुमित्रावरुण० ( १४ व १५) इत्यादिना च वस्त्रे बध्वा ग्रंथिं चंदनेन चर्चयेदिति आचारप्राप्तम् ।

ततो हरिद्राखंडं पंच पूगफलानि तथैव वरपित्रादिर्गृहीत्वा अमुकगोत्र—अमुकवरविषये भवंतो निश्चिता भवंत्विति दातृवस्त्रप्रान्ते प्रक्षेपादि कुर्यात् ।

**दाता**—वाचा दत्ता मया कन्या पुत्रार्थे स्वीकृता त्वया ।
कन्यावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव ॥ ४ ॥
( इति वरपितरं प्रतिपठेत्)

---

हा सर्व प्रकार आटोपल्यावर हळकुंडें व पांच सुपाऱ्या कन्यापित्यानें घेऊन त्यावर गंध, अक्षत, फूल घालून त्या अमुक गोत्रप्रवरामध्यें उत्पन्न झालेला अमक्याचा पणतु इ. अमुक नांवाचा हा वर यास, अमुक गोत्रामध्यें उत्पन्न झालेली अमक्याची पणती इत्यादि अमुक नांवाची ही कन्या ज्योतिष्यानें सांगितलेल्या सुमुहूर्तावर देईन असें आतां वाणीनें सांगतों असें म्हणावें आणि 'अव्यंगेऽपतिते क्लीवे०'(३) हा श्लोक म्हणून वरपक्षांतील मुख्याच्या पदरांत'तदस्तु मित्रा०' (१४-१५ )या मंत्रानें त्या सुपाऱ्या बांधून गांठीवर गंधाक्षत घालावी.

---

३ व्यंगरहित, पातित्यरहित, आणि पुरुषत्वरहित, तसेंच * दहा दोष नसलेल्या अशा वराला देव, अग्नि आणि ब्राह्मण यांच्या सन्निध ही कन्या मी देतों. ( पुराणोक्त )

दशदोषाः— उन्मत्ता वृत्तिहीनाश्च तथापस्मारदूषिताः । दूरस्था कुष्टिनो मूर्खाः मोक्षमार्गानुसारिणः। शूरा अवेद्या निवृत्ता दशदोषयुता वराः।

तथा षंढाश्च पतिताश्चक्षुःश्रोत्रविवर्जिताः । वर्जनीयाः प्रयत्नेन कन्यादाने न संशयः ॥ इति संस्काररत्नमाला.

अर्थः—१ उन्मत्त, २ ज्यांस उपजीविकासाधन नाहीं असा, ३ अपस्मार (फेंपरें) येणारा,४ परदेशीं राहणारा,५कुष्ट (कोड) असणारा, ६ मूर्ख, ७ मोक्षमार्गास अनुसरलेला, ८ शूर, ९ अक्षरशून्य, १०.ववाहाविषयीं पराङ्मुख तसेंच षंढ, पतित, डोळे आणि कान नसणारा यांना कन्या देऊं नये.

**ग्रहीता**—वाचा दत्ता त्वया कन्या पुत्रार्थं स्वीकृता मया ।
वरावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव ॥ ९ ॥
( इति दातारं प्रतिपठेत् )

( भ्रात्रादौ स्वीकर्तरि भ्रात्रर्थं मित्रार्थमित्याद्यूहः कार्यः । )

**ब्राह्मणाः**—शिवा आपः संतु । सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु । दीर्घमायुः श्रेयः शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु । एतद्वः सत्यमस्तु ।

**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।**
**समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ ६ ॥**

---

तसेंच वरपक्षांतील मुख्यानेंहि वर सांगितल्याप्रमाणें हळकुंड व सुपाऱ्या घेऊन अमुकगोत्रामध्यें उत्पन्न झालेला इत्यादि अमुक नांवाच्या वरास कन्या देण्याविषयीं तुमचा निश्चय दृढ असू दे असें सांगून, त्या कन्यापित्याच्या पदरीं बांधून ग्रंथीवर गंधाक्षत घालावी.

नंतर कन्यापित्यानें 'वाचा दत्ता मया कन्या० ( ४ ) हा श्लोक म्हणावा. व वरपक्षानें 'वाचा दत्ता त्वया कन्या० ( ५ ) हा श्लोक म्हणावा. वरपित्याच्या स्थानीं भ्राता किंवा मित्र इत्यादिक असेल तर त्यानें भ्रात्यासाठीं किंवा मित्रासाठीं कन्येचा स्वीकार करतों असें म्हणावें.'

---

४ मी मनःपूर्वक दिलेली कन्या तूं पुत्राकरतां मनःपूर्वक स्वीकारली आहेस. कन्येचें नीट अवलोकन करून, तिच्यांत कांहीं दोष नाहींत अशी निश्चिति करून घेऊन निश्चय करा आणि सुखी व्हा.

५ वरील प्रमाणेंच वराबद्दल प्रार्थना आहे

६ तुमचा अभिप्राय एकसारखा असावा. तुमचीं अन्तःकरणें एकसारखीं असावींत. तुमचें मन एक असावें, कीं जेणें करून तुमच्या संघशक्तीची बळकटी होईल. ( ऋ. १०.१९४.४ )

**ॐ प्र सु ग्मंतां धियसानस्य सक्षणिं वरेभिर्वरां अभि षु प्रसीदतः। अस्माकमिंद्र उभयं जुजोषति यत्सोम्यस्यांधसो बुबोधति ॥७॥**

( इति मंत्रौ पठेयुः । )

**दाता**---( पात्रस्थमितंतंदुलपुंजे शचीमावाह्य षोडशोपचारैः पूजयेत्तां च कन्यैवं प्रार्थयेत् )

देवींद्राणि नमस्तुभ्यं देवेंद्र–प्रियभामिनि ।
विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे ॥ ८ ॥

( ततः पुरंध्रीभिर्नीराजनादिमांगलिकं कार्यम् )

( विप्राश्च गंधतांबूलादिना पूजिता आशीर्मंत्रान् पठेयुः )

**ॐ हिंकृण्वती वसुपत्नी वसूनां वत्समिच्छन्ती मनसाभ्यागात् । दुहामश्विभ्यां पयो अघ्न्येयं सा वर्धतां महते सौभगाय ॥ ९ ॥**

---

नंतर ब्राह्मणांनीं शिवा आपः संतु० इत्यादि मंत्र म्हणावे. मग कन्यापित्यानें एका पात्रांत कांहीं भुतलेले तांदूळ घालून त्यावर शचीचें आवाहन करून तिची षोडशोपचार पूजा करावी. कन्येनें तिची देवींद्राणि नम० ( ८ ) ह्या श्लोकानें प्रार्थना करावी. सुवासिनींनीं औक्षण करावें.

---

७ भक्ताच्या घरीं जाण्याविषयीं घोड्यांना इंद्र हाकारतो. घोडे सुंदर मार्गानें भक्ताच्या घराकडे जातात. ज्यावेळीं इंद्र सोमरूपी अन्नाचा आस्वाद जाणतो, त्यावेळीं इंद्र आमचें अन्न आणि स्तुति या दोहोंचा स्वीकार करो.

( ऋ. १०-३२-१ )

८ हे देवेंद्राच्या सुंदर स्त्रिये, तुला नमस्कार करतो. विवाह, भाग्य, आरोग्य आणि पुत्रलाभ मला दे. ( पुराणोक्त )

९ वासराच्या प्रेमानें हंबरणारी, आरोग्यादि संरक्षण करणारी, मनानें सदोदित मुलांची इच्छा करणारी अशी ही गाय असते. पालनीय अशी ही गाय देवांचें वैद्य अश्वि, यांच्या कृपेनें सर्वौषधिपूर्ण असें दुध आम्हांस देते. ती गाय आमच्या ऐश्वर्यवृद्धीकरतां सर्व प्रकारें उत्कर्ष पावो.

( ऋ. १-१६४-२७ )

ॐ वनस्पते शतवल्शो विरोह सहस्रवल्शा वि वयं रुहेम ।
यं त्वामयं स्वधितिस्तेजमानः प्रणिनाय महते सौभगाय ॥१०॥
ॐ इंदुर्देवानामुप सख्यमायन्त्सहस्रधारः पवते मदाय ।
नृभिः स्तवानो अनु धाम पूर्वमगन्निंद्रं महते सौभगाय ॥११॥
ॐ अस्य पिब क्षुमतः प्रस्थितस्येन्द्र सोमस्य वरमासुतस्य।
स्वस्तिदा मनसा मादयस्वार्वाचीनो रेवते सौभगाय ॥ १२ ॥
ॐ घृतादुल्लुतं मधुमत्सुवर्णं धनंजयं धरुणं धारयिष्णु ।
ऋणक्सपत्नां दधरांश्चकृण्वदारोह मां महते सौभगाय ॥ १३॥

---

नंतर उभयपक्षीयांना ब्राह्मणांची गंधादिकांनीं पूजा करून त्यांस दक्षिणा द्यावी. ब्राह्मणांनीं संतुष्ट होऊन हिंक्कृण्वती० ( ९ ते १५ ) इत्यादि मंत्रांनीं आशीर्वाद द्यावा. हा वाग्दानाचा विधि झाला.

---

१० हे वनस्पते, ( ज्या तूं ही तेजस्वी कुऱ्हाड मोठया उत्कर्षाकरतां प्राप्त केलीस ) ती तूं शेंकडो शाखांनीं वाढ. आमचाहि हजारो बाजूंनीं उत्कर्ष होवो. ( ऋ. ३-८-११ )

११ देवांचा मित्र आणि हजारो द्वारांनीं वाहणारा सोम देवांना उत्साह उत्पन्न करण्याकरतां पाझरतो. मनुष्यांनीं स्तविलेला सोम स्वर्गांत इंद्राकडे मोठया ऐश्वर्याला प्राप्त करून देत जातो. ( ९-९७-५ )

१२ हे इंद्रा, ह्या स्तुति करणाऱ्या आणि तुला सोम देणाऱ्या गृहस्थाचा हा सोमरसाचा उत्कृष्ट भाग तूं पी.कल्याणप्रद असा तूं मनानें प्रसन्न हो. धन आणि भाग्य देण्याकरतां आमच्या सन्मुख हो. ( ऋ. १०.११६.२ )

१३ तुपानें वाढणारा, मधुर,कान्तिमान्, धन जिंकणारा, आधार आणि व्यापक ईश्वर ( अग्नि ) शत्रूंचा नाश करतो, भक्तांचें संरक्षण करतो, तो आम्हांला मोठया योग्यतेला चढवो.

ॐ तद॑स्तु मित्रावरुणा तद॑ग्ने शं योर॒स्मभ्य॑मि॒दम॑स्तु श॒स्तम् ।
अ॒शी॒महि॑ गा॒धमु॒त प्र॑ति॒ष्ठां नमो॑ दि॒वे बृ॑ह॒ते साद॑नाय ॥ १४ ॥

गृहा वै प्रतिष्ठासूक्तं तत्प्रतिष्ठिततमया वाचा शंस्तव्यं तस्माद्यद्यदि दूर इव पशूँल्लभते गृहानैव वै नाना जिगामिषति गृहा हि पशूनां प्रतिष्ठा प्रतिष्ठा ॥ १५ ॥

( उभौ संमील्य गृहं गच्छेयुः । )

इति वाक्दान ( वाङ्निश्चय ) प्रयोगः समाप्तः ।

**अथ सीमान्तपूजनम् ।**

**संकल्पः**—अद्य शुभपुण्यतिथौ करिष्यमाणकन्याया विवाहाङ्गभूतं सीमान्ते वरपूजनं करिष्ये। तदङ्गं गणपति–वरुणपूजनं च करिष्ये। ( गणपतिं वरुणं च संपूज्य वस्त्रादिभिर्वरपित्रादीन् संपूज्य पादप्रक्षालनपूर्वकं वरं पूजयेत् । कर्मसाद्गुण्यार्थं भूयसीं दत्वा विष्णुं नमेत् ) इति समान्तपूजनम् ।

---

## सीमान्त पूजन

वाग्दान झाल्यावर विवाहाला योजलेल्या सुमुहूर्ताच्या पूर्वी कन्यापित्याच्या घरीं जाऊन पोंचतां येईल अशा सुमारानें वरपित्यानें आपली सर्व तयारी करून वरास घेऊन निघावें. इकडे कन्यापित्यानेंहि वराचा जो येण्याचा मार्ग असेल त्या मार्गानें येणाऱ्या वराची आपल्या गांवाच्या सीमेवर

---

१४ हे मित्रावरुणहो, हें सूक्त म्हटलें जावो. हे अग्ने, हें तुझें सूक्त म्हटलें जावो. आमचें कल्याण व्हावें व दुःख होऊं नये म्हणून हें सूक्त म्हटलें जावो. आम्ही अखंड भरभराट प्राप्त होण्याची इच्छा करतो. तसेंच विश्वाधार अशा महान् सूर्याला आम्ही नमस्कार करतों. ( ऋ. ५.४७.७. )

१५ घर हेंच प्रतिष्ठासूक्त आहे. त्याची उत्कृष्ट वाणीनें स्तुति करावी. तेथें जरी पशु दूर असले तरी ईश्वरीकृपेनें त्यांना प्राप्त करतो. घरांतच तो नाना गोष्टी प्राप्त करतो. घर हेंच पशूंचें आधारभूत निश्चित स्थान आहे (ऐ. ब्रा.)

## अथ विवाहपूर्वकृत्यम् ।

( वधूपिता वरपिता च विवाहदिनात्पूर्वेद्युर्विवाहदिन एव वा संस्कार्येण सह कृताभ्यंगस्नानोऽहतवासाः प्राङ्मुख उपविश्य स्वदक्षिणे पत्नीं तद्दक्षिणे संस्कार्यमुपवेश्य )

आचमनम्— प्राणायामः— देशकालोच्चारणम्—

**संकल्पः**—ममास्य अमुकशर्मणः पुत्रस्य दैवपित्र्यऋणापाकरणहेतुभूतधर्मप्रजोत्पादनसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहसंस्काराख्यं कर्म करिष्ये ।

---

गांठ पडेल अशा बेतानें कांहीं मंडळीसह निघून गांवाच्या सीमेवर जाऊन रहावें. त्या ठिकाणीं वर आला म्हणजे सर्वांचा आदर करून त्यांस त्या ठिकाणीं बसवावें; व मी कन्येचा विवाह करणार, त्याचें अंगभूत असें याठिकाणीं गांवाच्या सीमेवर, वराचें पूजन करतों, असा संकल्प करून गणपति व वरुण यांची पूजा करावी. नंतर वरपक्षीयास वस्त्रें व सुगंधि द्रव्यें द्यावीं. आणि वराचे पाय धुऊन त्यासहि वस्त्रभूषणें द्यावीं. कर्माच्या सांगतेकरतां दक्षणा द्यावी; व विष्णूस नमस्कार करावा.

येणेंप्रमाणें गांवाच्या सीमेवर वराचें पूजन झाल्यानंतर वरानें गांवांत यऊन रहावें. कन्यापित्यानेंहि आपल्या घरीं जावें.

## विवाहाच्या पूर्वीचे दिवशीं

विवाहाचे पूर्वदिवशीं वराच्या मातापितरांनीं व वरानें अभ्यंगस्नान करावें. तसेंच कन्येच्या मातापितरांनीं व कन्येनेंहि करावें. सर्वांनीं मंगलवेष धारण करावा. मंडपामध्यें सडासंमार्जन करून त्यावर रांगोळी घालून सर्व जमीन सुशोभित करावी. मंडप सुशोभित असावा. आपआपल्या मंडपामध्यें वस्त्र घातलेल्या शुभ आसनावर वराच्या व वधूच्या पित्यानें पूर्वाभिमुख बसावें. त्यांच्या उजव्या हाताकडे त्यांच्या स्त्रियांनीं बसावें. वरानें आपल्या मातेच्या उजव्या हाताकडे बसावें. तसेंच कन्येनेंहि बसावें.

( कन्यांविवाहे तु ) ममास्याः कन्यकायाः पुंसवन–सीमन्तोन्नयन– विष्णुबलि– जातकर्म– नामकरण– अन्नप्राशन–चौलान्तानां संस्काराणां लोपजनितप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारं पादकृच्छ्रं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजद्रव्यदानेनाहमाचरिष्ये ।

तथा भर्त्रा सह धर्मप्रजोत्पादनगृह्यपरिग्रह– धर्माचरणेष्वधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं श्वः विवाहसंस्काराख्यं कर्म करिष्ये। ( तदंगभूतमद्य गणपतिपूजनं स्वस्तिपुण्याहवाचनं मातृकापूजनं नांदीश्राद्धं ग्रहयज्ञमंडपप्रतिष्ठां कुलदेवतास्थापनं च करिष्ये इति संकल्प्य उक्तरीत्या मंडपप्रतिष्ठान्तं कुर्यात् )

## अथ वरस्य वधूगृहगमनम् ।

वरः कृतनित्यक्रियो विधिवत्कृतस्वस्तिवाचनो ब्राह्मणैःसह सात्विकाहारं भुक्त्वा अभुक्त्वा वा ईषद्धौतं नवं श्वेतं सदशं परेणाधृतं

---

नंतर आचमन प्राणायाम करून इष्टदेवता, कुलस्वामी, घरांतील वडील माणसें व ब्राह्मण यांस नमस्कार करून देशकालाचा उच्चार करावा. कन्यापित्यानें वरीलप्रमाणें संस्कारलोपाच्या प्रायश्चित्ताचा संकल्प करून आपल्या पतीबरोबर राहून धर्माचरण करण्याकरतां, मी माझ्या अमुक• नांवाच्या कन्येचा विवाह करतों असा संकल्प करावा.

वरपित्यानें ' देव व पितर यांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरतां, तसेंच धर्मसंबंधी सर्व कर्में सुरळीतपणें चालून पुढें धर्मोपयोगी संतति होण्याकरतां मी माझ्या अमुक नांवाच्या पुत्राचा विवाह करतों' असा संकल्प करावा. नंतर विवाहाचीं अंगभूत कर्में करण्याचा संकल्प सोडावा.

## वराचें वधूगृहीं गमन

विवाहाचे दिवशीं वरानें स्नानसंध्यादि नित्यकर्म आटोपून ब्राह्मण व इष्टमित्र यांसह भोजन करून किंवा केल्यावांचून, नवीं, एकदां धुतलेलीं, पांढरीं, दुसऱ्यानें न वापरलेलीं, ज्यांस दशा आहेत अशा दोनवस्त्रांपैकीं एक

वस्त्रयुगलं धृत्वालंकृतः स्रग्वी इष्टदेवतां पित्रादींश्च नमस्कृत्य तैरनुमोदितो यथाविभवमश्वादियानमारुह्य धृतसितच्छत्रः स्वर्चितैर्ज्ञातिबांधवैः कनिक्रदज्जनुषमिति ( १६ ) सुमंगलसूक्तपठनपरैर्ब्राह्मणैः पुरंध्रीभिः पूर्णकलशदर्पणकन्यापुष्पाक्षतदीपमालाध्वजलाजैर्मंगलगीततूर्यैश्च सह वधूगृहं गत्वा तद्द्वारदेशे प्राङ्मुखः स्थितो नीराजनपूर्णकलशयुक्तैः पुरंध्रीभिः प्रत्युद्यातो नीराजितोंऽतर्गृहं प्रविश्य तदंगणे मंडपाधः सोत्तरच्छदे हरितदर्भास्तीर्णे चतुष्पादभद्रपीठे प्राङ्मुख उपविशेत् ।

## मधुपर्कः

कन्यादाताः—– ( वरस्य पुरतः सुस्नातामलंकृतामहतवाससं गंधानुलिप्तां स्रग्विणीं भुक्तवतीं कन्यां तथाविधासने प्रत्यङ्मुखीमुपवेश्य तां पुरस्कृत्य सामात्यः सपत्नीक उपविश्य आगताय वराय तच्छाखोक्तविधिना मधुपर्कं कुर्यात् । प्राणानायम्य देशकालौ संकीर्त्य)

---

नेसावें व एक अंगावर घ्यावें. अलंकार, मंडावळी धारण करावी. आणि इष्टदेवता, वडील माणसें, यांस नमस्कार करून त्यांची आज्ञा घेऊन घोडा, पालखी इत्यादि सामर्थ्यानुरूप वाहनावर बसून श्वेतछत्र घेऊन निघावें. उत्तम पोषाख केलेले इष्टमित्र बरोबर असावे. ब्राह्मणांनीं कनिक्रदत् ( १६ ) सूक्त म्हणत वराच्या बरोबर जावें. बरोबर सुवासिनीहि असाव्या. उदकपूर्णकलश, आरसा,कुमारिका, पुष्पं, अक्षता, दीप, पुष्पमाला, ध्वज, साळीच्या लाह्या इतकीं बरोबर असावी. वाटेनें जात असतां गायन, मंगलवाद्यें यथाशक्ति असावींत. अशी मिरवणूक मुलीच्या घराजवळ गेल्यावर वरानें मंडपाच्या द्वाराशीं पूर्वेकडे तोंड करून उभे रहावें. कन्यापक्षीय सुवासिनींनीं उदकपूर्णकलश व आरती घेऊन सामोरे जावें व वरास आरती करावी. मग वरानें मंडपांत जाऊन शुभासनावर बसावें.

---

१६ हें सूक्त व त्याचा अर्थ शेवटीं पहा.

संकल्पः— कन्यार्थिने गृहागतायास्मै स्नातकाय वराय कन्यादानाङ्गभूतं मधुपर्कं करिष्ये ।

( प्रागुक्तलक्षणं दर्भमयं कूर्चं— ) विष्टरो विष्टरो विष्टरः ॥

( इति त्रिर्निवेद्य आसनार्थं वरहस्ते दद्यात् )

वरः— अहं वर्ष्मेत्यस्य वामदेवो विष्टरोऽनुष्टुप् । विष्टरोपवेशने विनियोगः ।

ॐ अहं वर्ष्म सजातानां विद्युतामिव सूर्यः ।
इदं तमभितिष्ठामि यो माकश्चाभिदासति ॥ १७ ॥

---

## मधुपर्काचा अर्थ

कन्यापित्यानें वराच्या समोर एक आसन तयार करावें व मंगलस्नान केलेली, अलंकृत, नूतन वस्त्र परिधान केलेली, सुगंधी द्रव्य अंगास लावलेली, पुष्पमाला धारण केलेली; व भोजन करून तृप्त झालेली अशा कन्येस वरापुढील आसनावर प्रत्यङ्मुख बसवावी. आणि आपणहि पत्नीसहित तसेंच बसावें. आणि आलेल्या वराची त्याच्या आज्ञेप्रमाणें मधुपर्कपूजा करावी.

कन्यापित्यानें वराची मधुपर्कपूजा करण्याकरतां स्वच्छ उदकानें भरलेलीं, पाय धुण्यासाठीं एक, अर्घ्याकरतां एक, मंत्रपूर्वक तीन वेळ आचमन करण्यासाठीं एक व केवळ आठ वेळ आचमन करण्यासाठीं एक, अशीं चार पात्रें, मधुपर्काचें ( मध व दही एकत्र केलें म्हणजे त्यास मधुपर्क असें म्हणतात ) एक पात्र, कांस्यपात्र, धेनु, विष्टर म्हणजे पंचवीस दर्भांचीं खाली अग्रें करून डावे हाताकडे पीळ घातलेली दोरी, इतकें साहित्य घेऊन पत्नीसहित वराच्यापुढें पश्चिमाभिमुख बसावें. आचमन व प्राणायाम करून

---

१७ विद्युल्लतेचा जसा सूर्य तसा सजातीयांचा मी मुख्य आहे. जो मला सुख देईल त्यावर मी उभा रहात आहे. ( आश्व. गृ. १. २४. ८. )

---

१ मधुपर्काचे वेळीं कन्येला बसविण्याविषयीं प्रयोगांत लिहिलें आहे खरें; परंतु अलीकडे कोठेंहि बसविण्याची चाल नाहीं. कन्यापिता व त्याची स्त्री हीं उभयतांच मधुपर्कपूजा करतात.

( इति उदगग्रे विष्टरे उपविशेत् । विष्टरं मंत्रेण पद्भ्या-माक्रम्यावासीत )

**कन्यादाता**—पाद्यं पाद्यं पाद्यम् । ( इति वराय दद्यात् )

( ततस्तेनोदकेन वरस्य दक्षिणसव्यपादौ क्रमेण क्षालयेत् )

तत्र मंत्राः—

अस्मिन् राष्ट्रे श्रियमावेशाम्यतो देवीः प्रतिपश्याम्यापः ।
दक्षिणं पादमवनेनिजेऽस्मिन् राष्ट्र इन्द्रियं दधामि ॥
सव्यं पादवमनेनिजेऽस्मिन् राष्ट्र इन्द्रियं वर्धयामि।
•पूर्वमन्यमपरमन्यं पादाववनेमिजे ।

---

देशकालाचा उच्चार करावा. नंतर माझी कन्या मागण्याकरतां आलेल्या ह्या वराची, कन्येच्या अंगभूत असणारी मधुपर्कपूजा करतों. असा संकल्प करावा. पूर्वी सांगितलेला विष्टर घेऊन सन्मानपूर्वक वराला बसण्याकरतां–' विष्टरो विष्टरो विष्टरः ' असें म्हणून वराच्या हातांत द्यावा. तो वरानें हातांत घेऊन अहं वर्ष्म० ( १७ ) हा मंत्र म्हणून विष्टरांचीं अग्रें उत्तरेस करून त्यावर बसावें किंवा हातीं न घेतां पायांनीं अलीकडे घेऊन त्यावर बसावें.

कन्यापित्यानें पाद्याचें पात्र हातांत घेऊन ' पाद्यं पाद्यं पाद्यं ' असें म्हणून तें पात्र वराच्या स्वाधीन करावें आणि तेंच पात्र घेऊन आपल्या पत्नीच्या हातीं देऊन तिजकडून वराच्या पायावर पाणी घालवावें व आपण

---

१८ आमच्या ह्या राष्ट्रांत सर्व प्रकारचें ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून हे उदकदेवतांनों, तुमचा आम्ही उपयोग करतों. ह्या आमच्या राष्ट्रांत इंद्रियें बळकट असावींत म्हणून ह्या थोर पुरुषांचे मी डावा व उजवा पाय स्वच्छ करतों. प्रथम एक आणि नंतर दुसरा पाय मी स्वच्छ करतों. राष्ट्राच्या संरक्षणाकरतां आणि निर्भयपणा प्राप्त व्हावा म्हणून पाय शुद्ध करणाऱ्या ह्या उदक देवता माझ्या शत्रूंना जाळून टाकोत. ( ऐ. ब्रा. ४०-३५ )

देवा राष्ट्रस्य गुप्त्या अभयस्यावरुध्यै ॥
आपः पादावनेजनीर्द्विषन्तं निर्दहन्तु मे ॥ १८ ॥

**वरः**—( लौकिकेनोदकेनाचम्य )

**कन्यादाता**— ( गंधमाल्यफलादिसंयुक्तं पूर्ववत् ) अर्घ्यम्, अर्घ्यम्, अर्घ्यं प्रतिगृह्यताम् । ( इति वराञ्जलौ प्रक्षिपेत् )

आचमनीयं, आचमनीयं, आचमनीयं प्रतिगृह्यताम् ।

**वरः**—प्रतिगृह्णामि (प्रतिगृह्य। तदेकदेशं गृहीत्वा ) अमृतोपस्तरणमसि । ( इति पीत्वा, लौकिकोदकेनाचम्य ) ( आनीयमानं मधुपर्कं ) मित्रस्य त्वा चक्षुषा प्रतीक्षे ॥ १९ ( इत्यवेक्ष्य )

**कन्यादाता**—मधुपर्कः मधुपर्कः मधुपर्कः ।

( इति त्रिर्निवेदितं मधुपर्कं--- )

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यां ॥ २० ॥

( इत्यंजलिना प्रतिगृह्य, अंजलिस्थमेव )

---

वराचा अगोदर उजवा पाय व मग डावा पाय, असे 'अस्मिन् राष्ट्रे०' ( १८ ) हे मंत्र म्हणून धुवावे. ( धुतल्यावर कोऱ्या वस्त्राने पुसण्याची चाल आहे ) वराने शुद्ध उदकाने आचमन करावें. कन्यापित्याने अर्घ्याच्या पात्रांत गंध, पुष्प, फळ ( सुपारी ) घालून तें अर्घ्य वराच्या अंजलींत ' अर्घ्यम् अर्घ्यम् अर्घ्यम् ' असें म्हणून घालावें. तसेंच आचमनीय असें तीनदां म्हणून मंत्रपूर्वक आचमन करण्याचें पात्र वरापुढें ठेवावें. वरानें त्यांतील थोडें उदक आपल्या हातावर घेऊन ' अमृतोपस्तरणमसि' हा मंत्र म्हणून प्राशन करावें. व दुसऱ्या शुद्ध उदकानें आचमन करावें.

---

१९ मित्रदृष्टीनें मी तुझ्याकडे पहातों.

२० सूर्यदेवाच्या उत्पत्तिसामर्थ्यानें, अश्विदेवांच्या बाहूनें आणि पूषन्‌च्या हातानें तुला घेतों ( अर्पण करतों ) ( ऐ. ब्रा. )

मधुवाता इति तृचस्य राहूगणो गौतमो विश्वेदेवा गायत्री ।
मधुपर्कावेक्षणे विनियोगः ।

**ॐ मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः।**
**माध्वीर्नः सन्त्वोषधीः ।**
**मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवं रजः ।**
**मधु द्यौरस्तु नः पिता ।**
**मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः ।**
**माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ २१ ॥**

( इति तृचेनावेक्षेत् । ततस्तत्पात्रं सव्यहस्ते धृत्वा अंगुष्ठानामिकाभ्यां मधुपर्कं त्रिः प्रदक्षिणमालोड्य )
वसवस्त्वा गायत्रेण च्छंदसा भक्षयन्तु ॥ २२ ॥
( इति पूर्वतः क्षिपेत् )

---

नंतर कन्यापित्यानें वराला अर्पण करण्याकरतां मधुपर्काचें पात्र आपलें हातीं घ्यावें व कन्यापित्याच्या हातांत असतांच वरानें ' मित्रस्यत्वा०( १९ ) ह्या मंत्रानें त्या पात्रांतील मधुपर्क पहावा. कन्यापित्यानें तें पात्र ' मधुपर्को-मधुपर्को मधुपर्कः' असें म्हणून वराच्या पुढें करावें. वरानें देवस्य त्वा०(२०) हा मंत्र म्हणून तें मधुपर्कपात्र आपल्या अंजलींत घ्यावें आणि ' मधुवाता० ' ( २१ ) हे मंत्र म्हणून हातांतील मधुपर्काकडे पहावें. नंतर मधुपर्कपात्र हातांत घेऊन उजव्या हाताच्या अंगुष्ठ व अनामिका ह्यांनीं तीनदां प्रदक्षिणे-

---

२१ वायु सुखकर होवो. नद्या सुखकर पाझरोत. औषधी मधुर मधुर फलपुष्प देणाऱ्या होवोत. रात्र, सकाळ, मातृभूत पृथ्वी आणि पितृभूत आकाश आम्हांला सुखप्रद होवो. मोठमोठे वृक्ष, सूर्य आणि प्रकाश आम्हाला सुखप्रद होवो. ( ऋ. १. ९०. ६ ते ८. )

२२ वसु तुला गायत्री छंदानें भक्षण करोत. ( आश्व. गृ.१.२४.१५ )

रुद्रास्त्वा त्रैष्टुभेन च्छंदसा भक्षयन्तु ॥ २३ ॥

( इति दक्षिणतः )

आदित्यास्त्वा जागतेन च्छंदसा भक्षयन्तु ॥ २४ ॥

( इति पश्चात् )

विश्वे त्वा देवा आनुष्टुभेन च्छंदसा भक्षयन्तु ॥ २५ ॥

( इति उत्तरतः )

भूतेभ्यस्त्वा भूतेभ्यस्त्वा भूतेभ्यस्त्वा ॥ २६ ॥

( इति मध्यात्त्रिरूर्ध्वं क्षिप्त्वा, मधुपर्कपात्रं भूमौ निधाय तदेकदेशं गृहीत्वा )

विराजो दोहोऽसि ॥ २७ ॥

( इति प्राश्य लौकिकोदकेनाचम्य पुनर्गृहीत्वा )

विराजो दोहमशीय ॥ २८ ॥

---

सारखा तो मधुपर्क ढवळावा. मग त्याच दोन बोटांनीं वसवस्त्वा० ( २२ ) पूर्वेकडे, रुद्रास्त्वा० ( २३ ) म्हणून दक्षिणेकडे, ' आदित्यास्त्वा० ( २४ ) म्हणून पश्चिमेकडे, ' विश्वेत्वादेवा० ( २५ ) म्हणून उत्तरेकडे ' भूतेभ्य० ( २६ ) म्हणून मध्यभागचा तीन वेळ वर उडवावा. नंतर तें पात्र भूमीवर ठेवावें आणि त्यातील किंचित् मधुपर्क हातावर घेऊन ' विराजो दोहोऽसि' ( २७ ) हा मंत्र म्हणून प्राशन करून शुद्ध उदकानें आचमन करावें.

---

२३ रुद्र तुला त्रिष्टुभ् छंदानें भक्षण करोत. ( आश्व. गृ. १.२४.१५

२४ आदित्य तुला जगती छंदानें भक्षण करोत.(आश्व. गृ. १.२४.१५)

२५ सर्व देव तुला अनुष्टुभ् छंदानें भक्षण करोत. (आश्व.गृ. १.२४.१५)

२६ तुला मी सर्व प्राण्यांना–सर्व प्राण्यांना–सर्व प्राण्यांना समर्पण करतो. ( आश्व. गृ. १.२५.१५. )

२७ तूं तेजस्वी असा काढलेला भाग आहेस.( आश्व. गृ. १.२५.१६ )

२८ तेजस्वी अशा तुला मी खातों. ( आश्व. गृ. १.२५.१६ )

( इति प्राश्य लौकिकोदकेनाचम्य पुनर्गृहीत्वा )

मयि दोहः पद्यायै विराजः ॥ २९ ॥

( इति प्राश्य लौकिकोदकेनाचम्य मधुपर्कशेषमुदङ्मुखो ब्राह्मणाय प्रयच्छेत् । लोकविद्विष्टत्वाद्वाप्सु निक्षिप्य पूर्वनिवेदिताचमनीयैकदेशं गृहीत्वा ) अमृतापिधानमसि ॥ ३० ॥

(इति पीत्वा लौकिकोदकेनाचम्य आचमनीयजलशेषं सर्वं गृहीत्वा)

सत्यं यशः श्रीर्मयि श्रीः श्रयताम् ॥ ३१ ॥

( इति प्राश्य लौकिकजलेन द्विराचमेत् । ततो दाता— )

गौर्गौर्गौः । ( इति त्रिर्निवेदितां गां )

---

फिरून किंचित हातावर घेऊन ' विराजो दोहमशीय ' ( २८ ) या मंत्रानें प्राशन करून शुद्ध उदकानें आचमन करावें. पुनः हातावर घेऊन ' मयि दोहः० ( २९ ) या मंत्रानें प्राशन करून शुद्ध उदकानें आचमन करावें. याप्रमाणें तीन वेळ प्राशन करून बाकी उरलेला मधुपर्क ब्राह्मणास देणें हें लोकविरूद्ध वाटतें म्हणून पाण्यांत टाकावा. ( असाच हल्लीं प्रघात आहे ). आचमनाच्या पात्रांतील उदक हातावर घेऊन ' अमृतापिधानमसि, ( ३० ) या मंत्रानें प्राशन करून दुसऱ्या शुद्ध उदकानें आचमन करावें. नंतर आचमनीय पात्रांतील उदक घेऊन ' सत्यं यशः' ( ३१ ) या मंत्रानें प्राशन करून शुद्ध उदकानें दोनदां आचमन करावें. मग कन्यापित्यानें ' गौर्गौर्गौः' असें म्हणून एक धेनु वरास निवेदन करावी. वरानें ' माता रुद्राणां '० ( ३२ ) हा मंत्र म्हणून तिला सोड म्हणून सांगावें. कन्यापित्यानें गंध, अक्षत, फुलें, वस्त्रें, दोन यज्ञोपवीतें, आंगठी वगैरे अलंकार

---

२९ माझे ठिकाणीं माझ्या स्थैर्याकरितां तेजस्वी असा तूं अस. ( आश्व. गृ. १.२४.१६ )

३० तूं अमृतरूपी झांकण आहेस. ( आश्व. गृ. १.२४.२१ )

३१ सत्य, कीर्ति, संपत्ति आणि कान्ति माझेजवळ असो. ( आश्व. गृ. १.२४.२२ )

माता रुद्राणामित्यस्य भार्गवो जमदग्निर्गौस्त्रिष्टुप् । गोरुत्स-
र्जने विनियोगः ।

**ॐ माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसादित्यानाममृतस्य नाभिः । प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गामनागामदितिं वधिष्ट ॥ ३२॥**

ॐ उत्सृजत । ( इति उत्सृजेत् । )

**कन्यादाता**— ( ततो गंधमाल्यवस्त्रयज्ञोपवीतयुग्माभरणादिभिर्यथाविभवं वरं पूजयेत् । ततो वरेण सहागतान् तद्बंधूनपि पूजयेत् । मधुपर्के दध्यभावे पयो जलं वा प्रतिनिधिः मध्वलाभे घृतं गुडो वा । )

---

आपणास अनुकूल असतील तेवढे देऊन त्याची पूजा करावी. वराबरोबर आलेल्यांसहि यथाशक्ति वस्त्रालंकार देऊन त्यांचा सन्मान करावा. येथें मधुपर्क संपला.

## गौरीहर पूजा.

विवाहाच्या दिवशीं कन्येला मंगलस्नान घालून तिला नवें, एकदां धुतलेलें वस्त्र नेसण्यास द्यावें. आणि पाटा व वरवंटा यावर हळदीनें गौरी व हर यांचीं चित्रें काढून त्यांसभोंवतें कोरें सूत गुंडाळावें व ते दोनहि पाषाण घरांत देवाजवळ किंवा दुसऱ्या निर्मळ जागीं ठेवावें. त्यांजवळ एका पात्रांत तांदळाची पुंज करून ते पात्र ठेवावें. तेथें कन्येला पूर्वाभिमुख बसवून गौरी-हरांची व पात्रांतील तांदळाच्या इंद्राणीची पूजा करवावी. पूजेच्या अन्तीं

---

३२ रुद्रांची आई, वसूंची मुलगी, आदित्यांची बहिण, आणि अमृताचें निधान अशा ह्या निरपराध आणि दैन्यरहित गाईस कोणी मारूं नका. मी समजुतदार लोकांना उद्देशून बोलत आहे. ( ऋ. ८.१०१.१५)

वरस्य या भवेच्छाखा तच्छाखा गृह्यचोदितः ।
मधुपर्कः प्रदातव्यो ह्यन्यशाखेऽपि दातरि ॥
मधुपर्के वधूतातः सपत्नकिः पराङ्मुखः ।

## अथ कन्यादानार्थं जलशुद्धिः ।

पुरोधाः—वरदक्षिणत उदङ्मुख उपविश्य मध्ये प्रागग्रानुदग्ग्रान्वा दर्भानास्तीर्य तेषु तैजसंशुद्धतीर्थादि जलपूर्णकलशं निधाय व्रीहियवानोप्य गंधपुष्पादिभिरलंकृत्य दूर्वापल्लवैर्मुखमपिधायाब्लिंगाभिरापोहिष्ठेति नवभिरभिमंत्रयेत् ।

---

कन्येकडून 'देवींद्राणि नम०'( ८ ) हा श्लोक म्हणवून प्रार्थना करवावी. सर्व पूजा संपूर्ण झाल्यावर कन्येनें त्याच ठिकाणीं आपल्याला निरंतर सौभाग्य प्राप्त होऊन संसारांतील सर्व प्रकारच्या सुखांचा लाभ होवो अशी प्रार्थना करीत बसावें.

## कन्यादानार्थ उदकशुद्धि

वराची मधुपर्कपूजा झाल्यावर कन्यापित्याच्या उपाध्यायानें, समुहूर्ती लग्न लागल्यानंतर कन्यादानाकरतां मंत्रविलेलें उदक पाहिजे यास्तव वराच्या उजव्या हाताकडे उदङ्मुख बसून कांहीं दर्भ पूर्वेस किंवा पश्चिमेस अग्रें करून आपल्यापुढें ठेवावें. त्यांवर तीर्थोदकानें किंवा शुद्धोदकानें भरलेलें ताम्रपात्र ठेवावें व त्या पात्रांत भाताच्या साळी आणि गहू घालून बाहेरून गंध, पुष्पमाला यांनीं तें सुशोभित करावें. तसेंच त्या पात्राच्या मुखावर कांहीं दूर्वा व आम्रपल्लव ठेवून त्या पात्राचें मुख आच्छादित करावें. मग ' आपोहिष्ठा० ' हे मंत्र म्हणावे म्हणजे तें उदक कन्यादानास योग्य होतें.

येथें पत्रिकापूजन करण्याची चाल आहे. पूजनाला ' प्रणोदेवी ० ' ( ऋ.६.६१.४ ) हा मंत्र म्हणतात. हा एक उत्तेजनाचा प्रकार आहे. याला आधार नाहीं

## परस्परनिरीक्षण.

समुहूर्त जवळ आला म्हणजे ब्राह्मणांनीं त्या सुशोभित मंडपांत मध्यभागीं एक हाताच्या अंतरानें पूर्व पश्चिम दोन राशी घालाव्या. प्रत्येक राशी शेर तांदळाची असावी. राशीच्या मध्यभागीं कुंकवानें दोनहि बाजूंस स्वस्तिकें काढून तो अन्तःपट दोन राशींच्यामध्यें उत्तरेस दशा करून दोघांनीं

## *वधूवरयोः परस्परनिरीक्षणम्

अथ ब्राह्मणाः स्वलंकृते वेश्मनि मंगलगीततूर्यनिर्घोषे क्रियमाणे पूर्वापरभागयोर्हस्तांतरालं विहाय प्रत्येकं प्रस्थपरिमितासिततंडुलैर्द्वौ राशी कृत्वा मध्ये कुंकुमांकितमन्तःपटं राश्योर्मध्ये उत्तरदशं धारयेयुः ।

अथ पूर्वराशौ प्रत्यङ्मुखं वरं पश्चिमराशौ च प्राङ्मुखीं कन्यां तंडुलगुडजरिकयुतांजली उभाववस्थाप्य ब्राह्मणा मंत्रान् मंगलाष्टकपद्यांश्च सुवासिन्यो मंगलगीतीः कुर्युः वधूवरौ च मनसा स्वेष्टदेवतां ध्यायंतौ स्वस्तिकालोकनपरौ समाहितौ तिष्ठेताम् ।

अथ ज्यौतिषिकेन मंगलपद्यपाठपूर्वकं सुमुहूर्तोऽस्तु, तदेव लग्नमिति पठिते प्रदिष्टे काले सद्योंतःपटमुदगपवार्य कन्यावराभ्यां परस्परस्मिन्नंजलिस्थतंडुलगुडजीरकावकिरणं परस्परनिरीक्षणं च करणीयं )

---

धरावा. नतर पूर्वेकडील राशीवर पश्चिमाभिमुख वरास उभा करावा. आणि पश्चिमेकडील राशीवर पूर्वाभिमुख कन्येस उभी करावी. वराच्या व कन्येच्या हातांत तांदूळ, गूळ व जिरे एकत्र करून दिलेलीं असावीं. ह्या वेळीं ब्राह्मणांनीं ' मत्येनोत्तभिता० ' ( शेवटीं पहा.) हें सूक्त म्हणावें. सुवासिनींनीं मंगल गीतें गावींत. वर व कन्या या उभयतांनीं आपआपल्या मनांमध्यें कुलस्वामीचें स्मरण करीत व अंतःपटावरील स्वस्तिकाकडे एकाग्रदृष्टीनें पहात निश्चळ उभे रहावें. नंतर ज्योतिष्याने मंगलाष्टकें, ' सुमुहूर्तोऽस्तु, तदेव लग्नं० ,

---

* टीप—सध्याच्या विवाहसंस्कारांत परस्परनिरीक्षणाला फार महत्त्व आलें आहे. वास्तविक मंगलाष्टके म्हणून परस्पर निरीक्षण करणाऱ्या भागाला शास्त्रांत आधार नाहीं, असें असतांनाहि लौकिक परन्तु न टाळतां येण्यासारखा हा भाग होऊन बसला आहे. कन्यादान व विवाहहोम हे दोनच भाग म्हणजे खरोखर विवाह होय.

२ मंगलाष्टकें शेवटीं दिलीं आहेत.

अभ्रातृघ्नीं वरुणापतिघ्नीं बृहस्पते ।
इंद्रापुत्रघ्नीं लक्ष्म्यंतामस्यै सवितः सुव ॥ ३३ ॥
( इति वरो जपन् वीक्षेत )

**अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यः सुमनाः सुवर्चाः ।**
**वीरसूर्देवकामा स्योना शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥ ३४ ॥**

( इति कन्ययावेक्ष्यमाणो जपित्वा दर्भाग्रेण तस्या भ्रुवोर्मध्यं )
ॐ भूर्भुवः स्वः । (इति व्याहृतिभिः परिमृज्याप उपस्पृशेत् )
ततस्त्रिवारं पंचवारं वा ऋक्चवे ( ३५ शेवटीं पहा ) त्यादिखंडांते वधूपूर्वमंजलिस्थापिताक्षतारोपणं करणीयमाचारात् )

---

( मंगलाष्टकें पहा. ) इत्यादि म्हणून सूचना केल्याबरोबर उभयतांमधील अंतःपट उत्तरेकडे काढून त्यांच्या हातांतील तांदूळ,गूळ व जिरें एकमेकांच्या मस्तकांवर घालवावे व उभयतांस एकमेकाकडे प्रेमभावानें पहावयास सांगावें. वधूकडे पहातांना वरानें ' अभ्रातृघ्नीं वरु० ' ( ३३ ) हा मंत्र म्हणावा. व वधू आपल्याकडे पहात असतां ' अघोर चक्षुरप० ' ( ३४ )हा मंत्र म्हणावा. निरीक्षणानंतर वरानें वधूच्या भृकुटीच्या मध्यभागी एका दर्भाच्या अग्रानें ' ॐ भूर्भुवः स्वः' म्हणून स्पर्श करावा.व तो दर्भ टाकून आचमन करावें.नंतर वरास पूर्वाभिमुख आणि वधूस पश्चिमाभिमुख अशी एकमेकांसमोर आसनांवर बसवावीं. ब्राह्मणांनी 'ऋक्चव इदमग्रे० '( ३५ शेवटीं पहा) इत्यादि ब्राह्मणां-

---

३३ हे वरुणा, भावांना सुखकारक, हे बृहस्पते पतीला सुखप्रद, हे इंद्रा, पुत्राला सुखप्रद,आणि हे सूर्या लक्ष्मीप्रद अशी ही असू दे. ( पुराणोक्त )

३४ हे वधू, तू शुभदृष्टि, पतीला हितप्रद, पशूंना सुखकर, चांगल्या मनाची आणि कान्तियुक्त अशी अस. वीर प्रसवणारी, श्रद्धाळू आणि सुखप्रद अशी हो. ( ऋ. १०.८५.४४ )

३५ ही देवांची, देवांना प्रिय असणारी संक्षिप्त नांवें आहेत.

## अथ कन्यादानम् ।

**ॐ अनृक्षरा ऋजवः सन्तु पंथा येभिः सखायो यंति नो वरेयम्। समर्यमा सं भगो नो निनीयात् सं जास्पत्यं सुयममस्तु देवाः३६**

( इति वरं प्राङ्मुखं वधूं च प्रत्यङ्मुखीं कृत्वा तद्दक्षिणतः सपत्नीक उदङ्मुख उपविश्य )

आचमनम् । प्राणायामः । देशकालोच्चारणम् ।

**संकल्पः**—अमुकप्रवरान्वितोऽमुकगोत्रोऽमुकशर्माहं मम समस्तपितॄणां निरतिशयसानंदब्रह्मलोकावाप्त्यादि–कन्यादान–कल्पोक्त फलावाप्तये अनेन वरेणास्यां उत्पादयिष्यमाणसंतत्या द्वादशावरान् द्वादशापरान् च पुरुषान् पवित्रीकर्तुमात्मनश्च श्रीलक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधिना कन्यादानमहं करिष्ये ।

(इति कुशाक्षतयुतजलेन संकल्प्य सपत्नीक उत्थाय उदङ्मुख एव कन्यां संप्रगृह्य । )

---

तील मंत्र म्हणावेंत. उपाध्यायानें उभयतांच्या हातीं अक्षता द्याव्या. आणि पूर्वी कन्येकडून व नंतर वराकडून एकमेकांच्या मस्तकावर त्या घालवाव्या, असें पुनः पुनः तीन वेळ किंवा पांच वेळ करवावें. हा आचार आहे.

### कन्यादान.

नंतर कन्येच्या अंगावर आपल्या सामर्थ्याप्रमाणें द्यावयाचे असतील तितके वस्त्रालंकार घालून कन्यापित्यानें कन्येचें दान करावें. ' अनृक्षरा ऋजवः सन्तु० ' ( ३६ ) हा मंत्र म्हणून वरास पूर्वाभिमुख आणि वधूस प्रत्यङ्मुख अशीं एकमेकांकडे तोंड करून उभीं करावीं. कन्यापित्यानें वधूवरांच्या

---

३६ हे देवहो, ज्या मार्गानें आमचे ( वराकडील ) मित्र कन्यापित्याकडे जातात ते मार्ग निष्कंटक आणि सरळ असोत. तसेंच अर्यमा आणि भगानीं आम्हांला चांगल्या प्रकारें पोंचवावें. हे देवहो, हे पतिपत्नी चांगलें असोत. ( ऋ. १०.८५.२३. )

कन्यां कनकसंपन्नां कनकाभरणैर्युताम् ।
दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥
विश्वंभरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः ।
इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च ॥ ३७ ॥

( इत्युक्त्वा स्वदक्षिणस्थभार्यादत्तपूर्वकल्पितजलधाराम-विच्छिन्नां नवकांस्यपात्रोपरि धृतकन्यांजलेः उपरिस्थे वरांजलिदक्षिणा हस्ते क्षिपन्वदेत् )

कन्या तारयतु । पुण्यं वर्धताम् । शिवा आपः सन्तु । सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु । दीर्घमायुः श्रेयः शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु । यच्छ्रेयस्तदस्तु । यत्पापं तत्प्रतिहतमस्तु । पुण्याहं भवंतो ब्रुवन्तु । स्वस्ति भवंतो ब्रुवन्तु । ऋद्धिं भवंतो ब्रुवन्तु । श्रीरस्त्विति भवंतो ब्रुवंतु ॥ ३८ ॥

---

दक्षिणेस स्त्रीसहित उत्तराभिमुख बसावे. नंतर आचमन व देशकालाचें स्मरण करून दर्भ, अक्षता व पाणी हातांत घेऊन ' मम समस्त पितॄणां ० ' येथ-पासून ' कन्यादानमहं करिष्ये ' येथपर्यंत म्हणून ब्रह्मलोकाची प्राप्ति होऊन त्या ठिकाणी अक्षय्य सुख ह तें असे जें कन्यादानाचें फल आहे तें माझ्या सर्व पितरांस मिळावें आणि या वरापासून माझ्या कन्येच्या टायीं होणाऱ्या संत-तीच्या मातृपितृकुलांतील मागील बारा पुरुष व पुढील बारा पुरुष आणि ती संतती मिळून पंचवीस पिढ्या इतकी पवित्र होण्याकरितां व माझ्यावर

---

३७ ब्रह्मलोक जिंकण्याच्या इच्छेने सुवर्णालंकार भूषित कन्या विष्णुस्वरूप असणाऱ्या तुला देतो.विश्वंभर, सर्व प्राणी आणि सर्व देवता साक्षीभूत आहेत. अशावेळीं ही कन्या पितरांच्या उद्धाराकरतां मी देतों. ( पुराणोक्त )

३८ कन्या तारो, पुण्य वाढो, उदक शुभप्रद असो, परस्परांचीं मनें शुद्ध असोत.अखंड समृद्धि दीर्घायुष्य, कल्याण,शान्ति, पुष्टि आणि संतोष असो. जें कल्याण तें असो जें वाईट तें नष्ट होवो. आपण शुभदिवस, कल्याण, समृद्धि आणि संपत्ति आहे असें म्हणावे.

अमुक प्रवरान्वितामुकगोत्रोऽमुकशर्माहं मम समस्तपितॄणां निरतिशयसानंदब्रह्मलोकावाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तये अनेन वरेणास्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या द्वादशावरान् द्वादशापरान् च पुरुषान् पवित्रीकर्तुमात्मनश्च श्रीलक्ष्मीनारायणप्रीतये अमुकप्रवरोपेतामुकगोत्रोत्पन्नायामुकप्रपौत्रायामुकपौत्रायामुकपुत्रायामुकशर्मणे श्रीधररूपिणे कन्यार्थिने वराय अमुकप्रवरोपेताममुकगोत्रोत्पन्नाममुकप्रपौत्रीममुकपौत्रीममुकपुत्रीममुकनाम्नीं कन्यां श्रीरूपिणीं प्रजापतिदैवत्यां प्रजोत्पादनार्थं तुभ्यमहं संप्रददे न मम ।

कन्यां प्रतिगृह्णातु भवान् ( इति वरहस्ते सकुशाक्षतजलं क्षिपन् प्रजापतिः प्रीयतामिति मनसा स्मरेत्—एवं त्रिः )

---

लक्ष्मीनारायणाची प्रीति व्हावी म्हणून, मी मुख्य ब्रह्मविधीनें कन्यादान करतों, असा संकल्प करावा. नंतर पत्नीसह उभे राहून कन्येच्या स्कंधाला स्पर्श करून ' कन्यां कनकसंपन्नां ० ' ( ३७ ) हे मंत्र म्हणावे. कांस्यपात्रावर कन्येचा अंजली त्यावर वराचा अंजलि आणि त्यावर आपला अंजलि धरावा. आणि पूर्वी कन्यादानाकरतां उपाध्यायानें मंत्रून ठेवलेलें उदकपात्र आपल्या उजव्या हाताकडे असणाऱ्या पत्नीच्या हातीं द्यावें आणि पत्नीकडून पात्रांतील पाणी आपल्या अंजलीवर बारीक धारेनें सतत घालवावें. तें आपल्या अंजलींतील पाणी, खालीं कन्येच्या अंजलीवर धरलेल्या वराच्या अंजलीच्या उजव्या हातावर पडून नंतर कन्येच्या अंजलींतून कांस्यपात्रांत पडत असावें. कन्यापित्यानें ' कन्या तारयतु पुण्यं वर्धतां ० ' ( ३८ ) इत्यादि मंत्र म्हणून अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला अमुक नांवाचा मी " मम समस्तपितॄणां ० " येथपासून ' लक्ष्मीनारायणप्रीत्यर्थ ' येथपर्यंत म्हणून अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला, अमुक नांवाची माझी कन्या आपली स्त्री करूं इच्छिणारा, विष्णुस्वरूप असा हा वर, यास अमुक गोत्रांत उत्पन्न झालेली अमुक नांवाची, पतीची इच्छा करणारी लक्ष्मीस्वरूपाची ही माझी कन्या, इच्या ठिकाणीं या वरानें प्रजा उत्पन्न करावी याकरतां देतों, असें म्हणून या कन्यादानाच्या

वरः—ॐ स्वस्ति । ( कन्याया दक्षिणांसमभिमृश्य )

**क इदं कस्मा अदात्कामः कामायादात्कामो दाता कामः प्रतिग्रहीता कामं समुद्रमाविश कामेन त्वा प्रतिगृह्णामि कामैतत्ते वृष्टिरसि द्यौस्त्वा ददातु पृथिवी प्रतिगृह्णातु ॥ ३९॥**

धर्मप्रजासिद्ध्यर्थं कन्यां प्रतिगृह्णामि ।

**दाता**—गौरीं कन्यामिमां विप्र यथाशक्तिविभूषिताम् ।
गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय ॥
कन्ये ममाग्रतो भूयाः कन्ये मे देवि पार्श्वयोः ।
कन्ये मे पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् ॥
मम वंशकुले जाता पालिता वत्सराष्टकम् ।
[1]तुभ्यं विप्र मया दत्ता पुत्रपौत्रप्रवर्धिनी ॥
धर्मे चार्थे च कामे च नातिचरितव्या त्वयेयम् ॥४०॥

---

योगानें प्रजापति तृप्त होवो, असें म्हणावें व आपण माझ्या कन्येचा स्वीकार करावा अशी वराची प्रार्थना करावी. ही प्रार्थना ऐकून वरानें ' ॐ स्वस्ति ' असें संमतिदर्शक वाक्य उच्चारावें. याप्रमाणें आणखी दोनदां म्हणावें. नंतर वरानें वधूच्या उजव्या खांद्याला आपल्या उजव्या हातानें स्पर्श करून ' क इदं कस्मा अदा० ' ( ३९ ) हा मंत्र म्हणावा. व धर्म आणि प्रजा यांच्या सिद्धीकरतां मी या कन्येचा स्वीकार करतों असें सांगावें. कन्यापित्यानें ' गौरीं कन्यामिमां० ' (४० ) हे श्लोक म्हणून धर्म, अर्थ व काम हे तीनहि पुरुषार्थ तुम्ही उभयतांनीं साधावे याकरतां ही कन्या दिली आहे,

---

३९ ब्रह्मदेवस्वरूप दाता हें कन्यारूपी द्रव्य मला देता झाला. इच्छा इच्छेला मिळाली. खरोखर येथें कामच देणारा घेणारा आहे. तूं वासनेंत प्रविष्ट झाली आहेस. हे वधू, मी संसाराच्या इच्छेनें तुझा स्वीकार करीत आहे. हें तुझें कार्य आहे. तूं पाऊसासारखी उत्पादक आहेस. द्योरूप दाता तुला देवो. पृथिवीस्वरूप तुला मी ग्रहण करतों.( आश्वलायनगृह्यसूत्र )

१ टीप—हाच खरोखर विवाह संस्कार होय.

**वरः**—नातिचरामि ।

दाताः—कृतस्य कन्यादानस्य सांगतार्थमिमां दक्षिणां तुभ्यमहं संप्रददे । ( इति यथाशक्ति सुवर्णं दद्यात् । )

**वरः**—यत्कक्षीवांसं वननं विश्वेदेवा अनुष्टुप् वधूकुक्ष्यभिमर्शने विनियोगः

**ॐ यत्कुक्षीवांसं वननं पुत्रो अंगिरसा भवेत् ।**
**तेन नोद्य विश्वेदेवाः संप्रियां समजीजनन् ॥ ४१ ॥**

( इति वधूदक्षिणकुक्षिमभिमृशेत् )

**पुरोधाः**—( कांस्यपात्रे पूर्वार्चितकलशजलमासिच्य ) अनाधृष्टमित्यस्य वामदेव आपो बृहती उदकाभिमंत्रणे विनियोगः ।

ॐ अनाधृष्टमस्यनाधृष्यं देवानामोजो अभिशास्तिपाः ।
अनभिशस्त्यंजसा सत्यमुपगेषांस्विते माधाः ॥ ४२ ॥

---

म्हणून पुरुषार्थसाधनाचे कामांत हिचें उल्लंघन करूं नये असें वरास सांगावें. वरानें ' उल्लंघन करणार नाही.' असें म्हणावें. नंतर कन्यादानाचें संपूर्ण फल मिळावें म्हणून शक्तीप्रमाणें वरास सुवर्णादि यथाशक्ति द्यावें. वरानें कन्येच्या उजव्या कुक्षीला स्पर्श करून ' यत्कुक्षीवासं० ' ( ४१ ) हा मंत्र म्हणावा.

---

४० हे गृहस्था, यथाशक्ति भूषित केलेली ही कन्या तुला संतती व सुखाकरतां दिलेली आहे तिचा तू स्वीकार कर. हे कन्ये, तू माझी सर्व बाजूंनीं संरक्षक होऊन तुझ्या दानामुळें मला मोक्ष प्राप्त होईल. माझ्या वंशांत झालेली आणि इतकीं वर्षें वाढविलेली कन्या तुला मी दिली आहे. तिचें तू धर्म, अर्थ आणि काम यांत अतिक्रमण करूं नकोस.

४१ अंगिरसांच्या कृपेनें दात्या कक्षीवानाला पुत्र झाला त्याच कृपेनें आम्हांला आज देव आवडती संतती देवोत.

४२ तुझ्यापेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं, तुझ्यावर चढाई कोणी करूं शकत नाहीं देवांचें सामर्थ्य तूं आहेस. तू तुझ्या भक्तांचें पालन करणारा आहेस,

( इति जलमभिमंत्र्य सहिरण्यपवित्रया सकुशदूर्वापल्लवया सपर्णयौदुंबयार्द्रया शाखया वधूवरावभिषिंचेत् । तत्र मंत्राः—)

ॐ आनः प्रजामिति सूर्यासावित्री सूर्यासावित्री जगती अभिषेके विनियोगः ।

**ॐ आ नः प्रजां जनयतु प्रजापतिराजरसाय समनक्त्वर्यमा। अदुर्मंगलीः पतिलोकमा विश शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ४३**

**ॐ समुद्रज्येष्ठाः सलिलस्य मध्यात् पुनाना यंत्यनिविशमानाः । इंद्रो या वज्री वृषभो रराद ता आपो देवीरिह मामवन्तु ॥ ४४ ॥**

**ॐ आपो हि ष्ठा मयोभुवस्ता नं ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ॥ ४५ ॥**

---

भक्ति न करणारांना तूं तावडतोब ताळ्यावर आणतोस, मला नित्यांचें बल दे.

पुरोहितानें पूर्वी मंत्रून ठेवलेलें उदक एका कांस्यपात्रांत ओतून घेऊन 'अनाधृष्टं०' (४२) या मंत्रानें तें मंत्रवावें. मग सुवर्ण, दर्भ, दूर्वा व औंदुबराचे ताजे कोंवळे पल्लव यांनीं वधूवरांस 'आ नः प्रजां जनयतु०' (४३) 'समुद्र ज्येष्ठा०' (४४) 'आपो हिष्ठा०' (४५) 'देवस्य त्वा०' (४६) या मंत्रांनीं अभिषेक करावा. तो झाल्यावर दुहेरी पांढरे

---

४३ देव प्रजापति आम्हाला प्रजा देवो. अर्यमा आम्हांला म्हातारपणापर्यंत आयुष्य देवो. मंगलकारक अशी तूं पतिसमीप प्राप्त हो. आमच्या आप्तइष्टांना आणि पशूंना तूं सुखकारक हो. (ऋ. १०.८५.४३.)

४४ पवित्र करणारें, आणि सतत नमन करणारे पाणी आकाशाच्या मध्यांतून येतें. वज्र धारण करणारा कामपूरक इंद्र ज्या उदकांत ओरडतो तें उदक येथें माझें संरक्षण करो. (ऋ.७.४९.१.)

४५ हे उदकांनो, तुम्ही आमचें कल्याण करणार व्हा. आम्हांला धन आणि बळ द्या. (ऋ. १०.९.१.)

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यां। ४६
( वर एवोदकाभिमंत्रणकन्याभिषेकौ कुर्यादिति केचित् )
( ततो दुग्धाक्तेन द्विगुणशुक्लसूत्रेण दंपतिकंठदेशे कटिदेशे चैशानीमारम्य पंचवारं चतुर्वारं वा प्रदक्षिणं वेष्टयेदेतैर्मंत्रैः—)
ॐ परिं त्वा गिर्वणो गिरं इमा भंवन्तु विश्वतः ।
वृद्धायुमनु वृद्धयो जुष्टा भवन्तु जुष्टयः ॥ ४७ ॥
( ततो कंठदेशस्थं सूत्रमधो निष्कास्य कुंकुमाक्तमूर्णायुतं च कृत्वा हरिद्राखंडयुतं वधूवामहस्तप्रकोष्ठे वरो बध्नीयात् । तत्र मंत्रः—)
ॐ नीलुलोहितं भंवति कृत्यासक्तिर्व्यज्यते ।
एधंते अस्या ज्ञातय पतिर्बन्धेषु बध्यते ॥
( ततः कटिदेशस्थमुपरि निष्कास्य तद्वद्वरदक्षिणप्रकोष्ठे वधूर्बध्नीयात् तेनैव मंत्रेण ) इति कन्यादानम्

---

सूत दुधात भिजवून, त्याने वधूवरांस समोरासमोर बसवून त्यांच्या कंठास व कटीस चारवेळ किंवा पांच वेळ वेष्टन करावें. वेष्टनाचे वेळी ' परित्वा गिर्वणो० ' ( ४७ ) हे मंत्र म्हणावे. वेष्टन करून झाल्यावर कंठाचे सुत खाली जमिनीवर ठेवून कटीचे सूत्र वर काढावे, आणि वधूवरांस उठवून जमिनवरचे सूत्र उचलावे. त्या सूत्रांस कुंकुम लावून पीळ घालावा व त्या सूत्रांत हळकुंड व उर्णा ( लोकर ) बांधून ते सूत्र वरानें वधूच्या डाव्या

---

४६ (विसावा मंत्र पहा.)

४७. हे इंद्रा, आमच्याकडून नेहमी केल्या जाणाऱ्या, दीर्घायु अशा तुझ्याकडे येऊन पुनः पुनः कराव्याश्या वाटणाऱ्या प्रार्थना तुला प्राप्त होवोत आणि तुला संतुष्ट करोत. (ऋ. १-१०. १२ ).

४८ अभिचाराभिमानिनी देवता नीलवर्ण व रक्तवर्ण आहे. अशी ही कृत्या वधूच्या शरीरांत राहते तीस मी घालवितों. ती कृत्या गेली म्हणजे या वधूचे आप्त उत्कर्ष पावतात. पति ताब्यांत येतो. ( ऋ. १०-८५-२८ )

## अक्षतारोपणम्

( अथ वधूवरौ परस्परमूर्धनि आयुर्वर्धनकरमक्षतारोपणं कुर्याताम् । तैजसपात्रे शुक्लशालितंडुलानादाय पात्रांतरे क्षीरधृतं चादाय वरः क्षालितपाणिः प्रक्षालितवध्वंजलौ क्षीरधृतं स्वहस्तद्वयांगुलिभिर्द्विरुपस्तीर्य द्विस्तंडुलानोप्य द्विरभिघारयेत् । वरांजलावप्येवं दात्रान्येन वा पूरिते दाता तदंजल्योः सुवर्णं निधाय कन्यांजलिं वरांजल्युपरि निधाय )

कन्या तारयतु । दक्षिणाः पांतु । बहुदेयं चास्तु । पुण्यं वर्धताम् । शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु । तिथिकरणमुहुर्तनक्षत्रासंपदस्तु ।

( इत्युच्चार्य वधूमुत्थाप्य तयांजलिस्थानक्षतान्—)

**वधूः**—भगो मे कामः समृध्यताम् । (इति वरमूर्धन्यारोपयेत्)

**वरः**—यज्ञो मे कामः समृध्यताम् ।

( इति स्वांजलिस्थान् वधूशिरासि क्षिपेत् )

---

मनगटास ' नीललोहितं० ' ( ४८ ) या मंत्रानें बांधावे. तसेच कटीचें सूत्र पूर्वीप्रमाणें करून वधूने तें सूत्र त्याच मंत्रानें वराच्या उजव्या मनगटास बांधावे.

एका पात्रांत शुभ्र तांदूळ घ्यावे आणि दुसऱ्यांत दूध व तूप एकत्र करून घ्यावें. नतर वधूवरांनीं आपले हात धुवावे. वराने वधूच्या अंजलींत दोन वेळ दूध व तूप एकत्र केलेलें किंचित घालावे; त्यावर कांही तांदूळ घालून वरून दोन वेळ दूधतूप घालावे आणि तो वधूचा अंजलि तसाच असूं द्यावा. मग कन्यापित्याने वराच्या अंजलींत प्रथम दोनदां दूधतूप, मग तांदूळ व फिरून दोनदां दूधतूप घालावे. ( कन्यापित्यावांचून दुसऱ्या कोणी घातले तरी हरकत नाहीं. ) त्या उभयतांच्या अंजलातील तांदूळावर सुवर्ण ठेवून वधूचा अंजलि वराच्या अंजलीवर ठेवून ' कन्या तारयतु० ' हे मंत्र म्हणून नंतर कन्येस उठवून ' भगो मे कामः समृध्यताम् ० ' ( ४९ ) हा

वधू:—श्रियो मे कामः समृध्यताम् ।

वरः—धर्मो मे कामः समृध्यताम् ।

वधू:—प्रजा मे कामः समृध्यताम् ।

वरः—यशो मे कामः समृध्यताम् ॥ ४९ ॥

( ततः कन्या वरांजलिं द्विरुपस्तीर्य द्विस्तण्डुलानोप्य द्विरभिघारयेत् । दात्रान्येन वा पूर्ववत्कन्यांजलावापूरिते दाता तदंजल्योः सुवर्णं निधाय वरांजलिं कन्यांजल्युपरि निधाय कन्या तारयत्विति वाक्यषट्कं वदेत् । )

वरः—यज्ञो मे कामः समृध्यताम् ।

वधू:—भगो मे कामः समृध्यताम् ।

वरः—धर्मो मे कामः समृध्यताम् ।

वधू:—श्रियो मे कामः समृध्यताम् ।

वरः—यशो मे कामः समृध्यताम् ।

वधू:—प्रजा मे कामः समृध्यताम् ॥ ५० ॥

---

मंत्र तिच्याकडून म्हणवून अंजलींतील अक्षता वराच्या मस्तकावर घालवाव्या. नंतर वरानें ' यशो मे काम० ' ( ५० ) या मंत्रानें वधूच्या मस्तकावर आपल्या अंजलींतील अक्षता घालाव्या. फिरून पूर्वीप्रमाणें उभयतांचे अंजलि तयार झाल्यावर वधूनें ' श्रियो मे काम० ' या मंत्रानें वराच्या मस्तकावर अक्षता घालाव्या.

---

४९ वधू माझी ऐश्वर्यप्राप्तीची इच्छा पूर्ण होवो.

५० वर-माझी त्यागाची इच्छा पूर्ण होवो.

वधू-माझी संपत्तीची इच्छा पूर्ण होवो.

वर-माझी धर्माची इच्छा पूर्ण होवो.

वधू-संततीची माझी इच्छा पूर्ण होवो.

वर-कीर्तीची माझी इच्छा पूर्ण होवो.

( अथ वरः कन्यांजलिमापूर्य स्वांजलिमन्येन पूरयित्वा उभौ वधूपूर्वं तूष्णीमक्षतानारोपयेताम् । अथ वरः स्वशिरःपुष्पमेकं क्षीरघृतेनाप्लाव्य कन्याललाटे तिलकं कुर्यात् । सापि स्वशिरःपुष्पेण वरललाटे तिलकं कृत्वा पुष्पमालां वरकंठे निदध्यात् । वरोऽपि कन्याकंठे । ततो वरपक्षसुवासिन्यः वधूवरौ प्राङ्मुखावुपवेश्याचारप्राप्ताष्टपुत्रीसंज्ञं वस्त्रद्वयं सकंचुकं कृष्णमणिसूत्रयुतं वध्वै समर्प्य तामेकं परिधाप्यापरमुत्तरीयं कुर्युः । )

---

नंतर अंजली तयार करण्यापासूनच क्रिया फिरून दोनदां करावी. मात्र एकदां समंत्रक करावी व एकदां अमंत्रक करावी.

नंतर वरानें आपल्या मस्तकावरील एक पुष्प घेऊन दूध व तूप मिश्र केलेल्या पात्रांत बुडवून त्या पुष्पानें वधूच्या ललाटास तिलक करावा. वधूनेंहि आपल्या मस्तकावरील एक फूल मिश्रणांत बुडवून वराच्या ललाटास तिलक करावा. व एक पुष्पमाला वराच्या गळ्यांत घालावी. नंतर वरानेंहि वधूच्या गळ्यांत घालावी. वरपक्षीय सुवासिनींनीं वधूवरांस प्राङ्मुख बसवून अष्टपुत्री नांवाचीं दोन उत्तम वस्त्रें, चोळी व मंगळसूत्र हीं कन्येस द्यावीं. व त्यांतील एक कन्येस नेसवून अंगांत चोळी घालवावी व दुसरें वस्त्र अंगावर द्यावें, नंतर वरास तें मंगळसूत्र वधूच्या कंठांत बांधावयास सांगावें. वरानें ' मांगल्यतंतुना ० ' ( ५१ ) या मंत्रानें आपल्या इष्टदेवतेचें स्मरण करून तें वधूच्या कंठांत बांधावें. मग ' आयुष्य वर्चस्य ० ' ( समा वर्तन संस्कार १९ ) या मंत्रांनीं कन्येस अलंकार घालावेत. एका पात्रांत पांच सुपाऱ्या, हळकुंडें व लाडू ठेवून पुरोहितानें वधूवरांकडून ' गणानां त्वा ० ' या मंत्रानें पूर्वोक्त पात्रांत गणपतीची षोडशोपचार पूजा करवावी. पूजा झाल्यावर गणपतीचे संतोषाकरितां सामर्थ्यानुसार ब्राह्मणांस दक्षिणा द्यावी. पुरोहितानें त्या पूजा केलेल्या सुपाऱ्या वधूवरांच्या अंगावरील वस्त्राच्या पदरांत बांधाव्या. वधूवरांनीं विवाह आटोपेपर्यंत त्यांची गांठ सोडूं नये. पुरोहितानें 'नीललोहितं ०'(४८) या मंत्रानें वधूवरांच्या अंगावरील वस्त्राचे पदर एकत्र करून एक गांठ बांधावी.

वरः—मांगल्यतंतुनानेन भर्तृजीवनहेतुना ।

कंठे बध्नामि सुभगे सा जीव शरदां शतम् ॥५१॥

( इति मंत्रेणेष्टदेवतां स्मरन् वधूकंठे बध्नीयात् भूषयेच्च । ततो हरिद्राखंडयुतपंचपूगफलानि कृत्वा तत्र वधुवरौ गणपतिं पूजयेताम् । ततस्तानि पूगफलानि विवाहव्रतरक्षणं गणपतिमनुस्मृत्य दंपत्योरुत्तरीयांतयोःपूजामंत्राभ्यां बध्नीयात् वधुवरौ विवाहव्रतसमाप्तिपर्यंतं तद्ग्रंथिद्वयं न विसृजेताम् )

---

कन्येचा पिता व माता, वृद्धसुवासिनी, आप्त इत्यादिकांनीं वधूवरांच्या ललाटांस अक्षता लावाव्या व उभयतांस आशीर्वाद द्यावा. एका पात्रांत शुभ्र तांदळाचे तीन पुंज करून त्यावर महालक्ष्मी, पार्वती व शची या तीन देवतांची उभयतांनीं षोडशोपचारें पूजा करावी. वरील देवतांचीं नांवें हेच या पूजेस मंत्र समजावे. पूजा झाल्यावर आपणांस सौभाग्यादि प्राप्त होण्याकरतां त्या देवतांची प्रार्थना करावी. नंतर पूजा केलेल्या लक्ष्मी आदिकरून सर्व देवतांच्या संतोषार्थ वधूनें सुवासिनी स्त्रियांस वायनें द्यावींत. पुढें देशकालांचें स्मरण करून ‘ आजपासून चार दिवसपर्यंत विवाहव्रताचें आचरण करणार ’ असा उभयतांनीं संकल्प करावा. पहिल्या म्हणजे विवाहाचे दिवशीं आपण उभयतां रोहिणीसोम आहों असें मानून दाक्षायणी नामक देवतेची पूजा करावी. मग वधूचा हात धरून वरानें विवाहहोम करण्यासाठीं मंडपांतील वेदीवर जाण्याकरतां घरांतून बाहेर निघावें.

---

५१ हे पतिव्रते पतीच्या म्हणजे माझ्या जीवनाला कारण असें हें मंगलसूत्र मी तुझ्या गळ्यांत बांधतों, तूं माझ्यासह शंभर वर्षें सुखानें नांद.

## अथ विवाहहोमः ।

**वरः**—( वेदिकायामासन उपविश्य पश्चिममार्गेण नियमितवाचं वधूमानीय स्वदक्षिणत उपवेश्य )

आचमनम् । प्राणायामः । देशकालोच्चारणम् ।

**संकल्पः**—प्रतिगृहीतायामस्यां वध्वां भार्यात्वसिद्धये **गृह्याग्निसिद्धये** च विवाहहोमं करिष्ये ।

( ततो वैश्वदेवतंत्रेण स्थालीपाकतंत्रेण वाग्निकार्यं कृत्वा )

विवाहहोमः—अग्न आयूंषीति तिसृणां शतं वैखानसा ऋषयः, अग्निः पवमानो देवता, गायत्री छंदः, विवाहप्रधानाज्यहोमे विनियोगः।

**ॐ अग्न आयूंषि पवस आसुवोर्जमिषं च नः ।**
**आरे बाधस्व दुच्छुनां स्वाहा ॥ ५२ ॥**

अग्नये पवमानायेदं न मम ।

---

### विवाहहोम

वरानें वेदीजवळ गेल्यावर आपण वेदी( भोवलें )वर चढून तीवरील आसनावर पूर्वाभिमुख बसावें. नतर वधूला वेदीच्या पश्चिमेकडून यावयास सांगून वेदीच्या उत्तरेकडून वर चढवून आपल्या उजव्या हातास बसवावी. वेदीवर आल्यापासून वधूनें मौन धारण करावें. वरानें दोन वेळ आचमन करून प्राणायाम व देशकालाचा उच्चार करावा. आणि प्रतिग्रहरूप नें स्वीकारलेल्या या वधूस भार्यात्व यावें आणि गृह्याग्नि सिद्ध व्हावा याकरतां विवाहहोम करतों असें म्हणून त्यासाठीं स्थंडिलादि कृत्य करावें. स्थंडिलाच्या पश्चिमेस पाटा व वरवंटा ठेवावा. ईशान्येस साळीच्या लाह्यांच्या राशीवर पाण्यानें भरलेला एक कलश ठेवावा. त्या कलशावर आंब्याचे पल्लव ठेवून तो गंध, फुलें, इत्यादिकांनीं सुशोभित करावा. स्थंडिलाच्या

---

५२ हे अग्ने, तू आमच्या आयुष्याचें रक्षण करावेंस. बल व शरीर यांना पुष्ट करणारें अन्न उत्पन्न करावेंस आणि दुर्भिक्षादिकांना आम्हांपासून दूर करावेंस. ( ऋ. ९. ६६. १९ )

ॐ अग्निर्ऋषिः पवमानः पाञ्चजन्यः पुरोहितः ।
तमीमहे महागयं स्वाहा ॥ ५३ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ।
ॐ अग्न पवस्व स्वपा अस्मे वर्च. सुवीर्यम् ।
दधद्रयिं मयि पोषं स्वाहा ॥ ५४ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ।
त्वमर्यमा वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् । विवाहप्रधानाज्यहोमे विनियोगः ।
ॐ त्वमर्यमा भवसि यत्कनीनां नाम स्वधावन् गुह्यं बिभर्षि।
अजंति मित्रं सुधितं न गोभिर्यद्दंपती स मनसा कृणोषि
स्वाहा ॥ ५५ ॥ अग्नय इदं न मम ।
प्रजापते हिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् । विवाहप्रधानाज्यहोमे विनियोगः।

---

उत्तरेकडील बाजूस तांदुळाचे पूर्वपश्चिम सात पुंज करावे. नंतर वरानें दोन समिधा हातांत घेऊन देशकालाचा उच्चार करून विवाहहोमाचा संकल्प सोडावा.

विवाहहोम-'अग्न आयूंषि०' (५२ते५६) इत्यादि पांच मंत्रांनीं क्रमानें होम करून झाल्यावर वरानें उठून वधूच्या पुढें पश्चिमाभिमुख उभें रहावें, आणि पांचहि अंगुलींसह वधूचा उताणा उजवा हात उजव्या हातानें

---

५३ अशी मागणी आम्ही सर्वचक्षु, निषादिक पंच वर्णांना हितकर असणारा आणि आपणांपुढें सर्व प्रकारचीं धर्मकर्मे करण्याकरितां स्थापन केलेला अशा ह्या महाधन अग्नीला करितों. ( ऋ. ९. ६६. २० )

५४ हे स्तुत्य कर्म करणाऱ्या अग्ने, तूं मला सामर्थ्य संपन्न करणारें धन दे. ( ऋ. ९. ६६. २१ )

५५ हे अग्ने, तूं सर्वांचा नियमन करणारा आहेस. ज्यावेळीं तूं मुलींच्या संबंधीं असतोस त्या वेळीं हे अन्नवन्ता, वैश्वानर असें गूढ नांव धारण करतोस. ज्याअर्थी तूं पतिपत्नींचीं मनें जुळवतोस म्हणून तुला हे निकट मित्राप्रमाणें तुपाच्या आहुति देतात. ( ऋ. ५. ३. २. )

**ॐ प्रजापते नत्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव ॥**
**यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां स्वाहा ॥५६**

प्रजापतय इदं न मम ।

( एवं पंचाहुतीर्हुत्वा प्राङ्मुखोपविष्टायाः पुरः प्रत्यङ्मुखस्तिष्ठन्वर उत्तानं सांगुष्ठं दक्षिणं पाणिमुत्तानेन स्वदक्षिणेन करेण )

गृभ्णामीत्यस्य सूर्यासावित्री सूर्यासावित्री त्रिष्टुप्, पाणिग्रहणे विनियोगः ।

**ॐ गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ।**
**भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥५७॥**

( इति हस्तं गृह्णीयात् )

ततो वधूमुत्थाप्य तया करौ क्षालयित्वांजलिं कारयित्वा

---

धरावा व ' गृभ्णामि ते० (५७) हा मंत्र म्हणावा. नंतर पूर्वस्थानीं येऊन वधूला उभें करावें व तिजकडून तिचे दोनहि हात स्वच्छ धुववावे. मग तिजकडून अंजलि करवून तिच्या अंजलांत स्रुव्यानें किंचित् आज्य घालावें. वधूच्या भ्रात्याकडून किंवा भ्रात्यासारख्या चुलतभाऊ वगैरे सारख्या कोणाकडून तिच्या अंजलांत दोन वेळीं एक एक मूठ लाह्या घालवाव्या. वरानें सुपांतील व अंजलींतील लाह्यांवर एक वेळ अभिघार करावा. नंतर उभे

---

५६ हे प्रजापते, उत्पन्न झालेल्या ह्या जगास तुझ्याशिवाय धारण करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. म्हणून ज्या इच्छेनें आम्ही तुला उद्देशून हवन करूं, त्या आमच्या इच्छा पूर्ण होवोत. तुझ्या कृपेनें आम्हांला धनवान होऊं दे. ( ऋ. १०. १२१. १०. )

५७ हे स्त्रिये, तूं मला पति करून, माझ्या संगतीनें राहून वृद्धावस्था संपादन करणार आहेस, म्हणून तुला सौभाग्यप्राप्ति होण्याकरतां तुझा हात मी ग्रहण करतों. भग, अर्यमा, सविता व पूषा या चार देवांनीं गृहस्थाश्रमांतील सर्व कर्में चालवण्याकरतां तुला माझ्या स्वाधीन केलें आहे.(ऋ. १०. ८५. ३६.)

ॐ अ॒ग्निर्ऋषि॒ः पव॑मान॒ः पाञ्च॑जन्य॒ः पु॒रोहि॑तः ।
तमी॑महे महाग॒यं स्वाहा ॥ ५३ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ।
ॐ अग्ने॒ पव॑स्व॒ स्वपा॑ अ॒स्मे वर्च॑ः सु॒वीर्य॑म् ।
दध॑द्र॒यिं मयि॒ पोषं॒ स्वाहा ॥ ५४ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ।
त्वमर्यमा वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् । विवाहप्रधानाज्यहोमे विनियोगः ।
ॐ त्वम॑र्य॒मा भ॑वसि॒ यत्क॒नीनां॒ नाम॑ स्वधाव॒न् गुह्यं॑ बिभर्षि ।
अ॒ञ्जन्ति॑ मि॒त्रं सुधि॑तं॒ न गोभि॒र्यद्दंप॑ती॒ सम॑नसा कृ॒णोषि॑
स्वाहा ॥ ५५ ॥ अग्नय इदं न मम ।
प्रजापते हिरण्यगर्भःप्रजापातिस्त्रिष्टुप् । विवाहप्रधानाज्यहोमे विनियोगः।

---

उत्तरेकडील बाजूस तांदुळाचे पूर्वपश्चिम सात पुंज करावे. नंतर वरानें दोन समिधा हातांत घेऊन देशकालाचा उच्चार करून विवाहहोमाचा संकल्प सोडावा.

**विवाहहोम**–'अग्न आयूंषि०' (५२तें५६) इत्यादि पांच मंत्रांनीं क्रमानें होम करून झाल्यावर वरानें उठून वधूच्या पुढें पश्चिमाभिमुख उभें रहावें, आणि पांचहि अंगुलींसह वधूचा उताणा उजवा हात उजव्या हातानें

---

५३ अशी मागणी आम्ही सर्वचक्षु, निषादिक पंच वर्णांना हितकर असणारा आणि आपणांपुढें सर्व प्रकारचीं धर्मकर्मे करण्याकरितां स्थापन केलेला अशा ह्या महाधन अग्नीला करितों. ( ऋ. ९. ६६. २० )

५४ हे स्तुत्य कर्म करणाऱ्या अग्ने, तूं मला सामर्थ्य संपन्न करणारें धन दे. ( ऋ. ९. ६६. २१ )

५५ हे अग्ने, तूं सर्वांचा नियमन करणारा आहेस. ज्यावेळीं तूं मुलींच्या संबंधीं असतोस त्या वेळीं हे अन्नवन्ता, वैश्वानर असें गूढ नांव धारण करतोस. ज्याअर्थीं तूं पतिपत्नींचीं मनं जुळवतोस म्हणून तुला हे निकट मित्राप्रमाणें तुपाच्या आहुति देतात. ( ऋ. ५. ३. २. )

**ॐ प्रजापते नत्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव ॥**
**यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां स्वाहा ॥५६**
प्रजापतय इदं न मम ।

( एवं पंचाहुतीर्हुत्वा प्राङ्मुखोपविष्टायाः पुरः प्रत्यङ्मुखस्तिष्ठन्वर उत्तानं सांगुष्ठं दक्षिणं पाणिमुत्तानेन स्वदक्षिणेन करेण )

गृभ्णामीत्यस्य सूर्यासावित्री सूर्यासावित्री त्रिष्टुप्, पाणिग्रहणे विनियोगः ।

**ॐ गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ।**
**भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥५७॥**
( इति हस्तं गृह्णीयात् )

ततो वधूमुत्थाप्य तया करौ क्षालयित्वांजलिं कारयित्वा

---

धरावा व 'गृभ्णामि ते०' (५७) हा मंत्र म्हणावा. नंतर पूर्वस्थानीं येऊन वधूला उभे करावें व तिजकडून तिचे दोनहि हात स्वच्छ धुववावे. मग तिजकडून अंजलि करवून तिच्या अंजलांत स्रुव्यानें किंचित् आज्य घालावें. वधूच्या भ्रात्याकडून किंवा भ्रात्यासारख्या चुलतभाऊ वगैरे सारख्या कोणाकडून तिच्या अंजलांत दोन वेळीं एक एक मूठ लाह्या घालवाव्या. वरानें सुपांतील व अंजलींतील लाह्यांवर एक वेळ अभिघार करावा. नंतर उभे

---

५६ हे प्रजापते, उत्पन्न झालेल्या ह्या जगास तुझ्याशिवाय धारण करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. म्हणून ज्या इच्छेनें आम्ही तुला उद्देशून हवन करूं, त्या आमच्या इच्छा पूर्ण होवोत. तुझ्या कृपेनें आम्हांला धनवान होऊं दे.
( ऋ. १०. १२१. १०. )

५७ हे स्त्रिये, तूं मला पति करून, माझ्या संगतीनें राहून वृद्धावस्था संपादन करणार आहेस, म्हणून तुला सौभाग्यप्राप्ति होण्याकरतां तुझा हात मी ग्रहण करतों. भग, अर्यमा, सविता व पूषा या चार देवांनीं गृहस्थाश्रमांतील सर्व कर्मे चालवण्याकरतां तुला माझ्या स्वाधीन केलें आहे.(ऋ. १०. ८५. ३६.)

प्राङ्मुख्यास्तस्या अंजलौ वरः स्रुवेणाज्यमुपस्तीर्य वधुभ्रात्रा तत्स्थानीयेन वा पितृव्यपुत्रादिना तिष्ठता शूर्पस्थान् लाजान् मुष्ट्या द्विरोप्य शूर्पस्थानंजलिस्थानपि सकृदभिघार्य ) . . . . .

वधूः—अर्यमणं नु वामदेवोऽर्यमाग्निरनुष्टुप् । विवाहप्रधानलाजहोमे विनियोगः

ॐ अर्यमणं नु देवं कन्या अग्निमयक्षत । स इमां देवो अर्यमा प्रेतो मुञ्चातु नामुतः स्वाहा ॥ ५८ ॥

( इति मंत्रं पठन् तिष्ठन् तिष्ठंत्या धृतांजलिरंजल्याविच्छेदेन अंगुल्यग्रैरंगुलिपार्श्वेण वा हावयेत् )

वरः —अर्यमाग्नय इदं न मम । ( इति त्यजेत् )

( ततो दृषदुपलवर्जमाग्निमुदकुंभं पात्राणि च वधूं प्रदक्षिणं परिणयन् स्वयमग्रे गच्छन् )

ॐ अमोहमस्मि सा त्वं सा त्वमस्यमोहं द्यौरहं पृथिवी त्वं सामाहमृक्त्वं तावेव विवहावहै प्रजां प्रजनयावहै संप्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ जीवेव शरदः शतम् ॥ ५९ ॥

---

राहून ' अर्यमणं नु० ' (५८) हा मंत्र म्हणून आपल्या दोनहि हातांनीं वधूची अंजलि धरून वधूच्या अंजलीच्या शेवटाकडून किंवा बाजूनें आंतील सर्व लाह्या होमांत घालवाव्या. नंतर वरानें पाट्यावरवंट्यावांचून होमपात्र व उदककुंभ यांसह अग्नीस प्रदक्षिणा करावी, प्रदक्षिणा करतांना वधूचा हात धरून आपण पुढें चालावें व वधूनें मागून जावें. प्रदक्षिणा करीत

---

५८ देदीप्यमान अर्यमा, ज्याला आजपर्यंत पुष्कळ कन्यांनीं हविर्द्रव्यांच्या योगानें संतुष्ट केलें असा जो अग्नि तो ह्या वधूचे आई बाप, बंधू इत्यादिकांवरील प्रेम कमी करवून त्यांच्या कुळांतून मुक्त करो; आणि माझे आईबाप, बंधू इत्यादिकांवर हिचें प्रेम वाढवून माझें कुळ न सोडतां माझेवर अनुरक्त राहण्याची बुद्धि देवो. ( आश्व. गृ. १. ७. १३. )

वधूः—(द्वाभ्यामपि पादाभ्यां दृषदम्) इममश्मानं वामदेवो वधूरनुष्टुप् अश्मारोहणे विनियोगः ।

ॐ इममश्मानमारोहाश्मेव त्वं स्थिरा भव ।
सहस्व पृतनायतोभितिष्ठ पृतन्यतः ॥ ६० ॥

( इति मंत्रेणारोहयेत् । पुनःपूर्ववदंजल्युपस्तरणादि कृत्वा )
वरुणं नु वामदेवो वरुणाग्निरनुष्टुप् । विवाहप्रधानहोमे विनियोगः।

ॐ वरुणं नु देवं कन्या अग्निमयक्षत ।
स इमां देवो वरुणः प्रेतो मुञ्चातु नामुतः स्वाहा ॥ ६१ ॥
वरुणाग्निभ्य इदं न मम । ( इति पूर्ववत् हावयेत् )

---

असता 'अमोऽहमस्मि०, (५९) हा मंत्र वरानें म्हणावा. नंतर वधूस दोनहि पाय पाट्यावर ठेवून उभें राहवयास सांगावे व वरानें 'इममश्मान०' ( ६० ) हा मंत्र म्हणावा. पुनः पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपस्तरणादिकरून वधूच्या अंजलींतील लाह्या 'वरुणं नु०' ( ६१ ) या मंत्रानें होमांत घालून मागल्या प्रमाणेंच 'अमोऽहमस्मि०' (५९) या मंत्रानें प्रदक्षिणा करावी व वधूस पाट्यावर उभें करून 'इममश्मान०' ( ६० ) हा मंत्र म्हणावा. फिरूनहि वरील प्रमाणें वधूच्या अंजलींतील लाह्या 'पूषणं नु०' ( ६२ ) या मंत्रानें होमांत घालून 'अमोऽहमस्मि०( ५९ ) या मंत्रानें प्रदक्षिणा करावी.

---

५९ हे स्त्रिये, मी सामवेदरूप आहें आणि तूं ऋग्वेदरूप आहेस. तसेंच मी आकाशरूप आहें व तूं पृथिवीरूप आहेस. उभयतां आम्ही अग्नि व ब्राह्मण यांच्या समक्ष विवाह करूं. नंतर प्रजा उत्पन्न करूं. मग एकमेकांवर प्रीति करूं. स्वरूप व स्वभाव इत्यादि गुणांनीं एकमेकांस आवडते होऊं. एकमेकांशीं निष्कपटपणें वागून शंभर वर्षें जगूं. ( आश्व. गृ. १-७-६ )

६०. हे वधू, तूं या पाषाणावर चढ आणि पाषाणाप्रमाणें मनानें घट्ट हो. हितशत्रूंना सद्वर्तनानें वश कर. ( आश्व. गृ. १.७.७ )

ॐ अमोहमस्मि सा त्वं सा त्वमस्यमोहं द्यौरहं पृथिवी त्वं सामाहमृक् त्वं तावेव विवहावहै प्रजां जनयावहै संप्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ जीवेव शरदः शतम् ॥ ५९ ॥

( इत्यग्निं परिणीय इममश्मानं ( ६० ) अश्मानमारोहयेत् पुनरंजल्युपस्तरणादि कुर्यात् )

पूषणं नु वामदेवः पूषाग्निरनुष्टुप् । विवाहप्रधानलाजहोमे विनियोगः ।

ॐ पूषणं नु देवं कन्या अग्निमयक्षत ।

न इमां देवः पूषा प्रेतो मुंचातु नामुतः स्वाहा ॥ ६२ ॥

( इति हावयित्वा परिणीय अश्मानमारोहयेत् )

ॐ प्रजापतये स्वाहा ।

( वरोऽवशिष्टान् लाजान् आत्माभिमुखं शूर्पकोणेन हावयेत् । नात्र परिणयनाश्मारोहणे )

( अथाग्नेरुदीच्यां सप्ततंडुलराशीन् बध्वा दक्षिणपादेन वरः क्रमेणाभ्युत्क्रामयेदेतैर्मंत्रैः )

---

वधूस पाट्यावर उभें करून ' इममश्मान० ' ( ६० ) हा मंत्र म्हणावा. नंतर पूर्वस्थानीं बसून लाह्यांचें सूप आपल्याकडे सुपाचें तोंड होईल असें धरून कोनानें ' प्रजापतये स्वाहा ' म्हणून सर्व लाह्या होमांत घालाव्या. यावेळीं प्रदक्षिणा व अश्मारोहण याचें कारण नाहीं.

होमाच्या उत्तरेस घातलेल्या तांदुळांच्या सातहि राशींवरून वरानें वधूस चालवावें. वधूनें प्रत्येकी राशीवर आपला उजवा पाय ठेवावा. प्रत्येक राशीवर वधूनें पाय ठेविला म्हणजे सात मंत्र म्हणावेत. नंतर वधूच्या मस्तकाचा आपल्या मस्तकाला स्पर्श करून ईशान्येस ठेविलेल्या कलशांतून उदक आपल्या व वधूच्या मस्तकास ' शांतिरस्तु० ' इत्यादि मंत्रांनीं लावावें.

---

६१ व ६२ फक्त देवतांचीं नांवें बदलून ५८ व्या मंत्राप्रमाणें अर्थ.

इष एकपदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरदष्टयः ॥ ६३ ॥

ऊर्जे द्विपदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरदष्टयः ॥ ६४ ॥

रायस्पोषाय त्रिपदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरदष्टयः ॥ ६५ ॥

मा यो भव्याय चतुष्पदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरदष्टयः ॥ ६६ ॥

प्रजाभ्यः पंचपदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्तें संतु जरदष्टयः ॥ ६७ ॥

ऋतुभ्यः षट्पदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरद्दष्टयः ॥ ६८ ॥

---

६३ हे वधू, तूं माझ्याबरोबर एक पाऊल चाललीस तेव्हां तुझें माझें सख्य झालें म्हणून तूं मला अन्न देणारी हो, आणि मला अनुकूल वाग. आम्हांला पुष्कळच पुत्र होवोत आणि ते दीर्घायुषी होवोत.

( आश्व. गृ. १-७-१९ )

६४ हे वधू, तूं माझ्याबरोबर दोन पावलें चाललीस. तूं माझें बल वाढीव. ( बाकी अर्थ वरीलप्रमाणेंच ) ( आश्व. गृ. १-७-१९)

६५ तूं तीन पावलें चाललीस म्हणून माझें धन वाढविणारी हो.

( आश्व. गृ. १.७. )

६६ तूं चार पावलें चाललीस याकरतां सुख वाढविणारी हो.

( आश्व. गृ. १.७. १९ )

६७ तूं पांच पावलें चाललीस म्हणून संतति वाढविणारी हो.

( आश्व. गृ. १. ७. १९ )

६८ तूं सहा पावलें चाललीस म्हणून सर्व ऋतूंत प्राप्त होणारे ते ते भोग देणारी हो. ( आश्व. गृ. १. ७. १९ )

सखा सप्तपदी भव सा मामनुव्रता भव पुत्रान्विंदावहै बहूंस्ते संतु जरदष्टय: ॥ ६९ ॥

( ततो वर: स्वशिरसा वधूशिर: संयोज्य पूर्वस्थापितकलशोदकेन पूर्वं स्वशिर: पश्चाद्वधूशिर: शांतिरस्तु ( पुण्याहवाचनस्थ ) इत्यादि मंत्रैरभिषिंचेत् । तत: स्वासने उपविश्य स्थालीपाकतंत्रेण वैश्वदेवतंत्रेण वा होमं समापयेत् । ततो पूर्वबद्धौ उत्तरीयान्तौ तूष्णीं विस्रस्य ध्रुवमरुन्धतीं सप्तऋषिप्रभृतीन् वध्वा सह दृष्ट्वा—)

जीवपत्नी प्रजां विंदेय ॥ ७० ॥

( इति वध्वा वाचयेत् । ततो वधूर्वाङ्नियमं विसृजेत् । दिनविवाहे सायंसंध्यामुपास्यैव ध्रुवादिदर्शनं रात्रिविवाहे तु सायंसंध्यामनुपास्यैवेति । इतो विवाहाग्निमभिरक्षेत् । )

## गृहप्रवेशनीयहोम: ।

वर:— (स्वगृहे देशकालौ संकीर्त्य ) मम विवाहाङ्गगृह्यत्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृहप्रवेशनीयहोमं करिष्ये ।

---

नंतर होम सपवून उभयतांची गांठ सोडावी. नंतर वधूसह वरानें ध्रुव, अरुंधती, सप्तऋषि यांचें दर्शन करावें. आणि ' जीवपत्नी प्रजां विंदेय ' असें वधूकडून म्हणवावें. नंतर वधूनें मौन सोडावें.

दिवसास विवाह असतां सायंसंध्या करून मग ध्रुवादिकांचें दर्शन करावें. रात्रीस विवाह झाला असतां संध्येच्या पूर्वीच ध्रुवदर्शन करावें. या दिवसापासून विवाहाग्नि राखिला पाहिजे.

---

६९ तूं माझ्याबरोबर सात पावलें चाललीस यामुळें तुझें माझ्याशीं सख्य दृढ होवो. ( आश्व. गृ. १-७-१९ )

७० माझा पति शतायु व्हावा आणि मला संतती प्राप्त व्हावी असें मी इच्छितें. ( आश्व. गृ. १-७-२२ )

( प्रत्यगग्नेः स्वदक्षिणतः प्राग्रीवे उत्तरलोम्नि आस्तीर्णे नवे आनडुहचर्मणि उपविष्टया वध्वा सह पूर्वाङ्गं कुर्यात् )

**प्रधानहोमः**—आ नः प्रजामिति ऋक्चतुष्टयस्य सूर्यासावित्री देवता, प्रथमा जगती, द्वितीया त्रिष्टुप्, तृतीयाचतुर्थ्यौ अनुष्टुभौ गृहप्रवेशनीयप्रधानाज्यहोमे विनियोगः ।

**ॐ आ नः प्रजां जनयतु प्रजापतिराजरसाय समनक्त्वर्यमा । अदुर्मङ्गलीः पतिलोकमाविश शन्नो भव द्विपदे शं चतुष्पदे स्वाहा ॥ ७१ ॥**

सूर्यासावित्र्या इदं न मम ।

**ॐ अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यः सुमनाः सुवर्चाः । वीरसूर्देवकामा स्योना शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे स्वाहा॥७२॥**

सूर्यासावित्र्या इदं न मम ।

**ॐ इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु । दशास्यां पुत्राना धेहि पतिमेकादशं कृधि स्वाहा ॥ ७३ ॥**

सूर्यासावित्र्या इदं न मम ।

---

संकल्पः—वरानें आपल्या घरीं हा होम करावयाचे पूर्वी आचमन व देशकालांचा उच्चार करून माझ्या विवाहाग्नीला गृह्यत्व येऊन परमेश्वराचा संतोष व्हावा याकरितां गृहप्रवेशनीय होम करतों. असा संकल्प मांडावा.

आपल्या उजव्या हाताकडे एक बैलाचें ताजें चामडें केस वर करून पूर्वेकडे मान करून घालावें व त्यावर वधूस बसवावी. तिनें वराच्या हातास हात लावून बसावें. अग्निस्थापनादि करावें. मग ' आनः प्रजां० ( ७१ ) इत्यादि चार मंत्रांनीं चार तुपाच्या आहुति घालाव्या. नंतर शेष राहिलेलें तूप

७१ ४३ वा मंत्र पहा. ७२ ३४ वा मंत्र पहा.

७३ हे इंद्रा, तूं ह्या वधूस सुपुत्रा आणि भाग्यशाली कर. हिला दहा मुलगे आणि नवरा अकरावा अशी कर. ( ऋ. १०.८५.४६ )

**ॐ सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञीं श्वश्वां भव ।**
**ननांदरि सम्राज्ञीं भव सम्राज्ञी अधि देवृषु स्वाहा ॥ ७४ ॥**

सूर्यासावित्र्या इदं न मम ।

**हृदयांजनम्ः**— समंजन्त्वित्यस्य सूर्यासावित्री सूर्यासावित्र्यनुष्टुप् । आज्यशेषेण हृदयांजने विनियोगः ।

**ॐ समंजन्तु विश्वे देवाः समापो हृदयानि नौ ।**
**संमातरिश्वा संधाता समुदेष्ट्री दधातु नौ ॥ ७५ ॥**

( इति हुतशिष्टाज्येन स्वस्य पत्न्याश्च हृदयांजनं कार्यम् ।

---

आपल्या अंगुलीनें घेऊन ' समंजतु विश्वे० ( ७५ ) या मंत्रानें तें आपल्या व वधूच्या हृदयास लावावें. मग सर्व होम संपवावा. नंतर सुवासिनी स्त्रियांनीं वधूवरांस कुरवंडी करावी. ब्राह्मणांस संतुष्ट करून त्यांपासून आशीर्वाद घ्यावेत व उभयतांनीं आनंदित असावें.

---

७४ हे वधू, तूं सासूसासऱ्यांवर, नन्दांवर आणि दीरांवर आपल्या कर्तृत्वानें छाप ठेवणारी हो. ( ऋ. १०-८५-४६. )

७५ सर्व देव आमचीं हृदयें मोकळीं करोत. उदकें आमचीं हृदयें संस्कृत करोत. मातरिश्वा, प्रजापति आणि सरस्वती आमचीं मनें परस्परांना अनुकूल करोत. ( ऋ. १०-८५-४७ )

---

अर्धरात्रे व्यतीते तु परेद्युः प्रातरेव हि ।
गृहप्रवेशनीयः स्यादिति यज्ञविदो विदुः

विवाहानंतर वर आपल्या घरीं घेऊन वधूसह ज्या दिवशीं गृहप्रवेश करील त्याच दिवशीं गृहप्रवेशनीय होम करावा. पण त्या दिवशीं उशीर झाला असेल म्हणजे मध्यरात्र उलटून गेली असेल तर त्या दिवशीं न करतां दुसरे दिवशीं करावा.

हस्तं प्रक्षाल्य वैश्वदेवतंत्रेण स्थालीपाकतंत्रेण वा होमशेषं समाप्य पति-पुत्रवतीभिः कृतनीराजनौ दंपती द्विजाशिषो गृहीत्वा मुदितौ तिष्ठेताम् ।
ततो विवाहात् द्वितीयाहेऽप्सरोगंधर्वौ भूत्वा महादेवीं पूजयेताम् ।

तृतीयाहे स्वाहाग्नी भूत्वा कालिकां पूजयेताम् ।

चतुर्थाहे मानवौ भूत्वा शांकरीं पूजयेताम् ॥

पूजात्र नाममंत्रेण षोडशोपचारा

वधूवरौ गृहप्रवेशनीयहोमोत्तरं त्रिरात्रं द्वादशरात्रं संवत्सरं वा यावदक्षारालवणाशिनावलंकुर्वाणावधःशायिनौ स्याताम् । )

इति गृहप्रवेशनीयहोमः ।

## ऐरिणीदानम्

( अथ विवाहचतुर्थदिने रात्रौ दिन एव वा आचारप्राप्तं वरमाते तत्समायै वा क्षुद्रषोडशवंशपात्रसहितमैरिण्याख्यं वंशपात्रं दद्यात् )

दाता—संकल्पः—अद्य शुभपुण्यतिथौ विवाहसंपूर्णफलावाप्तये वरस्य तत्पितृमात्रादीनां तत्पक्षीयाणां च यथाविभवं पूजनमहं करिष्ये ।

( यथाविभवं पट्टपट्टीदुकूलादिभिः पूजयेत् । )

---

गृहप्रवेशनीय होम झाल्यावर तीन दिवस, बारा दिवस किंवा एक वर्ष-पर्यंत वधूवरांनीं क्षार, धान्यें व मीठ खाऊं नये. निरंतर उत्तम वस्त्रालंकार धारण करून असावें आणि भूमीवर शयन करावें.

## ऐरिणीदान

विवाह दिवसापासून चौथ्या दिवसाचे रात्रीस व कांहीं भद्राव्यतिपातादि दुर्योग असतां दिवसासच वराच्या मातेला कन्यापित्यानें ऐरिणीचें दान द्यावें. वराची आई नसल्यास आजी किंवा चुलती इत्यादिकांस द्यावें. कन्येच्या पित्यानें मंडपांत पूर्वाभिमुख बसून आचमनादि करून विवाहाचें सर्व फळ

**ऐरिणीदानसंकल्पः**—अद्य शुभपुण्यतिथौ मम उमामहेश्वर-प्रीतिद्वारा कन्यादानसंपूर्णतायै वंशाभिवृद्धये च ऐरिणीपूजनं वरमात्रे ऐरिणीदानं च करिष्ये ।

ऐरिणि त्वमुमा देवी महेशो गिरिजापतिः ।
अतस्त्वां पूजयिष्यामि ऐरिणीं सर्वकामदाम् ॥ १ ॥
सवस्त्रां च सदीपां च शूर्पैः षोडशभिर्युताम् ।
वरमात्रे प्रदास्यामि कन्यादानस्य सिद्धये ॥ २ ॥ ( ७६ )

( नाममंत्रेण उमामहेश्वरौ षोडशोपचारैः पंचोपचारैर्वा संपूज्य इदं वंशपात्रं उमामहेश्वरप्रीतये तुभ्यमहं संप्रददे न मम ।
( इति वरमातृहस्ते जलं क्षिपेत् )

वंशो वंशकरः श्रेष्ठो वंशो वंशसमुद्भवः ।
अनेन वंशदानेन तुष्टिं ऋद्धिं करोतु मे ॥
वंशपात्रमिदं पुण्यं वंशजातिसमुद्भवम् ।
वंशानामुत्तमं दानमतः शांतिं प्रयच्छ मे ॥

---

आपणास मिळावें या करितां वराचे आई बाप व वरपक्षीय मंडळी यांचें यथाशक्ति मी पूजन करतों असा संकल्प करावा. सुवासिक द्रव्यें, वस्त्रें, व अलंकार इत्यादि वरपक्षीयांस देऊन त्यांस संतुष्ट करावें. फिरून देशकालाचा उच्चार करून उमामहेश्वराची प्रीति होऊन केलेलें कन्यादान पूर्ण व्हावें व वंश वाढावा या करितां मी ऐरिणीचें पूजन करतों व वराच्या मातेस दान देतों असा संकल्प करावा. ' ऐरिणि त्व० ( ७६ ) हे मंत्र म्हणून नाममंत्रानें त्या ऐरणीवर उमामहेश्वरांची षोडशोपचार पूजा करावी. पूजा झाल्यावर

---

७६ हे ऐरिणी, तूं उमादेवी आहेस आणि महेश्वर हा गिरिजापति आहे. म्हणून सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या ऐरिणीची मी पूजा करतों. १ सवस्त्र, सदीप आणि सोळा सुपल्यांनीं युक्त ऐरिणी मी कन्यादानाच्या सिद्धीकरतां वराच्या आईस देतें. २ ( पुराणोक्त )

वंशपात्राणि सर्वाणि मया संपादितानि वै ।
उमाकांताय दत्तानि मम गोत्राभिवृद्धये ॥
वंशवृद्धिकरं दानं सौभाग्यादिसमन्वितम् ।
वस्त्रेणाच्छादितं पूगफलहेमसमन्वितम् ॥
सर्वपापक्षयकरं नानाद्रव्यैस्तु पूरितम् ।
दानानामुत्तमं दानमतः शान्ति प्रयच्छ मे ॥ ७७ ॥

---

हे वेळूचे ऐरिणी नामक पात्र उमामहेश्वरांच्या संतोषाकरतां देतों असा संकल्प करुन वरमातेच्या हातावर उदक सोडावें व वंशा वंशकरः श्रुतः ( ७७ ) इत्यादि श्लोक म्हणावे. हें वंशपात्र वरमातेच्या व वरपक्षीय मुख्य मुख्य स्त्रीपुरुषांच्या सन्मानार्थ मस्तकावर ठेवण्याची चाल आहे. नतर कन्येच्या पित्यानें वरपित्याच्या मांडीवर कन्येस बसवून ' पूर्णवर्षा० ( ७८ ) या श्लोकानें त्याची प्रार्थना करावी. नंतर वधूकडून कांहीं दानधर्म करवावा. ऐरिणीदानाचे दिवशीं वधूच्या आईबापांनीं उपोषित राहून ऐरिणीदान झाल्यावर भोजन करावें.

---

७७ वेळू हा वंश वाढविणारा आहे. वंश वेळूपासून उत्पन्न झाला आहे. ह्या वेळूच्या दानांनीं मला संतोष आणि समृद्ध प्राप्त होवो. हे वेळूचें पात्र पुण्यप्रद आणि वेळूपासून उत्पन्न झालें आहे. हें वंशपात्राचें श्रेष्ठ दान आहे म्हणून मला तें शान्ति देवो. हीं सर्व वेळूचीं पात्रें मी संपादन केलीं आहेत आणि तीं गोत्रवृद्धीकरतां श्रीशंकराला समर्पण केलीं आहेत. वंशाची वाढ करणारे, ऐश्वर्ययुक्त, वस्त्राच्छादित, सुपारी, फळें, सुवर्ण यांनीं युक्त, सर्वपापनाशक, नानाद्रव्यपूर्ण असें दानात उत्तम दान मला शान्ति देवो.

---

ऐरिणी म्हणजे वेळूची केलेली लहान गोल सुपें व वेळूचीच मोटी डाली इतक्यास ऐरणी असें म्हणतात. ऐरणीपूजन केवळ रूढीमुळें करतात. याला आधार नाहीं पण मानापमानाचा पुरवठा करण्यास ह्या समारंभ उपयोगी पडतो. डाली डोक्यावर देणें हा मान समजला जातो.

( ततः कन्या वरपितृमात्रुत्संगयोः पृथक्पृथगुपवेश्य प्रार्थयेत् )

पूर्ण ( अष्ट ) वर्षा त्वियं कन्या पुत्रवत्पालिता मया ।
इदानीं तव पुत्राय दत्ता स्नेहेन पाल्यताम् ॥ ७८ ॥

ततो वधूर्द्विजातिभ्यो वायनादि दद्यात् । इदमैरिणिदानं वधूपितृभ्यामभुक्तवद्भ्यां कृत्वा भोजनं कार्यम् ।

इति ऐरिणीप्रदानम् ।

## गृहप्रवेशः

( अथ वध्वा सह गृहप्रवेशः )

**इह प्रियं प्रजया ते समृध्यतामस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि ।**
**एना पत्या तन्वं१ सं सृज स्वाधा जिव्री विदथ मा वदाथः॥७९**

( इति वध्वा सह गृहं प्रविशेत् )

( ततो वध्वा सह वरः स्वासने उपविश्य देशकालौ निर्दिश्य अनया नवोढया वध्वा सह कृतगृहप्रवेशाङ्गभूतं गणपतिपूजनं स्वस्तिपुण्याहवाचनं लक्ष्मीपूजनं च यथासंभवं कुर्यात् )

---

ऐरिणीदान झाल्यावर वधूवरांना वरगृही वाजत गाजत इष्टमित्रासह मोठ्या सन्मानानें पोंचवावें. घराजवळ आल्यावर वरानें ' इह प्रियं०' (७९) हा मंत्र म्हणत वधूसह घरांत प्रवेश करावा. मग वधूसह आसनावर बसून देशकालोच्चारण करून मी या वरेल्या वधूसह घरांत प्रवेश केला, यास्तव गृहप्रवेशांग-

---

७८ ही अमुक वर्षाची कन्या तुझ्या मुलाला दिली आहे. आजपर्यंत मुलासारखें हिचें पालन केलें आहे. तूं हिचें ममतेनें पालन करावेंस.

७९ हे वधू, तुझें ह्या कुलांत प्रजेसह प्रिय होवो. ह्या घरांत घरधनीपणाविषयीं तूं तत्पर अस. ह्या पतीशींसह अस. लोकांनीं आम्हांला ह्या घरांत म्हातारे झाले असें म्हटलें जावें. ( ऋ. १०. ८५. २७. )

ॐ सक्तुमिव तितंउना पुनंतो यत्र धीरा मनंसा वाच-
क्रत । अत्रा सखांयः सख्यानि जानते भद्रैषां लक्ष्मीर्निहि-
ाधि वाचि ॥ ८० ॥

( इत्यनेन महालक्ष्मीं षोडशोपचारैः पूजयेत् । नामादिकं च यथाचारं कार्यम् । ततो ब्राह्मणा आशीर्मन्त्रान् पठेयुः । )

**इति गृहप्रवेशः ।**

विवाहप्रयोगः समाप्तः

**आशीर्वचनमन्त्राः ।**

अविधवा भव वर्षाणि शतं साग्रं तु सुव्रता ।
तेजस्वी च यशस्वी च धर्मपत्नी पतिव्रता ॥
जनयद्बहु पुत्राणि मा च दुःखं लभेत्कचित् ।
भर्ता ते सोमपा नित्यं भवेद्धर्मपरायणः ॥

---

भूत गणपतिपूजन, पुण्याहवाचन, लक्ष्मीपूजन करतों असा संकल्प करावा. नंतर गणपतिपूजन व पुण्याहवाचन करून ' सक्तुमिव तितउना० (८०) या मंत्रानें महालक्ष्मीची षोडशोपचार पूजा करावी. नंतर त्या वधूचे वहिवाटी-प्रमाणें वरानें नांव ठेवावें. ' अविधवा भव० ( ८१ ) हे आशीर्वादार्थक मंत्र ब्राह्मणांनीं म्हणावेत.

येथें विवाहप्रयोग समाप्त.

---

८० चाळणीनें सातू ज्याप्रमाणें शुद्ध करतात त्याप्रमाणें येथें थोर लोक मनःपूर्वक वाणीचा उपयोग करतात.म्हणून थोर लोक मत्री मिळवितात. अशांच्या जिव्हेवर कल्याणप्रद लक्ष्मी वास करीत असते. (ऋ. १०. ७१. २)

अष्टपुत्रा भव त्वं च सुभगा च पतिव्रता ।
भर्तुश्चैव पितुर्भ्रातुर्हृदयानंदिनी सदा ॥
इन्द्रस्य तु यथेन्द्राणी श्रीधरस्य यथा श्रिया ।
शंकरस्य यथा गौरी तद्भर्तुरपि भर्तरि ॥
अत्रेर्यथानुसूया स्याद्वसिष्ठस्याप्यरुन्धती ।
कौशिकस्य यथा सती तथा त्वमपि भर्तरि ॥
ध्रुवैधि पोष्या मयि मह्यं त्वादाद्बृहस्पतिः ।
मया पत्या प्रजावती सं जीव शरदः शतम् ॥ १ ॥

---

## आशीर्वचनमन्त्रार्थ.

१ तूं शंभर वर्षे आरंभापासून शेवटपर्यंत नेमिष्ठ पवित्रता असावीस. तेजस्वी, कीर्तिमान् आणि धर्मपत्नी असावीस.

२ तुला अनेक पुत्र होवोत, आणि तुला केव्हाहि दुःख प्राप्त होऊं नये. तसेंच तुझा पति सदादित धर्मपरायण आणि सोम पिणारा असो.

३ तुला पराक्रमी आठ पुत्र असात. तसेच भाग्यशाली पतिव्रता अशी तूं हो. नवरा, बाप आणि भाऊ याना तूं नेहमी आनंद देणारी ऐस.

४ इंद्राची जशी इंद्राणी. विष्णूची जशी लक्ष्मी आणि शंकराची जशी पार्वती तशी तूं नवऱ्याला प्रिय हो.

५ अत्रीची जशी अनुसया, वसिष्ठाची जशी अरुंधती आणि कौशिकाची जशी सती तशी तूं नवऱ्याला प्रिय हो.

६ तुझा सतत उत्कर्ष कर. बृहस्पतीने तुला मला दिली आहे. पति पुत्र यांसह तू आनंद ने शंभर वर्षे जग.

## शकुनसूक्त

कनिक्रदज्जनुषं प्रब्रुवाण इयर्ति वाचमरितेव नावम् ।
सुमंगलश्च शकुने भवासि मा त्वा काचिदभिभा विश्व्या विदत् ॥
मा त्वा श्येन उद्वधीन्मा सुपर्णो मा त्वा विददिषुमान्वीरो अस्ता ।
पित्र्यामनु प्रदिशं कनिक्रदत्सुमंगलो भद्रवादी वदेह ॥
अव क्रंद दक्षिणतो गृहाणां सुमंगलो भद्रवादी शकुंते ।
मा नः स्तेन ईशत माधशंसो बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
प्रदक्षिणिदभि गृणंति कारवो वयो वदंत ऋतुथा शकुंतयः ।
उभे वाचौ वदति सामगा इव गायत्रं च त्रैष्टुभं चानु राजति ॥
उद्गातेव शकुने साम गायसि ब्रह्मपुत्र इव सवनेषु शंससि ।

---

१. सुकाणू जसें होडीला लोटतें, तसा हा आपल्या जातिबंधूंना ओरडून बोलतो आहे; तर हे पक्ष्या, तूं मंगलदायक हो; कोणत्याहि बाजूनें तुला संकट न येवो.

२. श्येन पक्षी किंवा गरुड पक्षी तुझा वध न करोत. बाण सोडणारा व्याध तुझा वध न करो. आपल्या वडलार्जित प्रदेशांत मंगलदायक असणारा तूं शुभ शब्द बोलत रहा.

३. हे चांगले शकुन देणाऱ्या पक्ष्या, आमच्या घराच्या दक्षिण बाजूस तूं ओरडत रहा, कीं जेणें करून चोर अगर दुष्ट लोक आम्हांस पीडा देऊं शकणार नाहींत आणि जमलेल्या सभेंत आम्ही चांगलें बोलूं.

४. इकडे उजव्या बाजूस विद्वान् मंडळी मोठ्यानें वेदसूक्तें पठन करित आहेत, तिकडे ऋतुमानाप्रमाणें पक्षी मोठयानें ओरडत आहेत. साम गाणाऱ्याप्रमाणें दोघेहि शब्दोच्चार करीत आहेत. गायत्री व त्रिष्टुभ छंदांतील स्तोत्रें गात आहेत.

वृषेव वाजी शिशुमतीरपीत्या सर्वतो नः शकुने भद्रमावद

विश्वतो नः शकुने पुण्यमावद ॥

आवदंत्वं शकुने भद्रमावद तूष्णीमासीनः सुमतिं चिकिद्धि नः ।

यदुत्पतन्वदसि कर्करिर्यथा बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥

---

## विवाहसुक्त

सत्येनोत्तभिता भूमिः सूर्येणोत्तभिता द्यौः ।

ऋतेनादित्यास्तिष्ठंति दिवि सोमो अधि श्रितः ॥ १ ॥

सोमेनादित्या बलिनः सोमेन पृथिवी मही ।

अथो नक्षत्राणामेषामुपस्थे सोम आहितः ॥ २ ॥

---

५. हे पक्ष्या, उद्गात्याप्रमाणें तूं गाणें गातोस. ब्राह्मणाच्या मुलाप्रमाणें यज्ञांत सूक्त म्हणतोस. घोडा घोडीला पाहून जसा आवेशांत येतो त्याप्रमाणें यज्ञांत हे पक्ष्या, तूं सर्व बाजूंनीं आवेशानें शुभ बोल.

६. हे पक्ष्या, तूं बोलत असशील तेव्हां आमच्या कल्याणाचें बोलत जा. जेव्हां स्वस्थ बसशील तेव्हां आमचें कल्याण चिंतीत जा, आणि उडत असतांना तुझा जसा जोराचा शब्द निघतो, तसें आम्ही जमलेल्या विद्वत्सभेंत मोठ्या आवेशानें बोलत रहावें. ऋग्वेद २.४२.४३

---

## विवाहसूक्त

१. सत्यानें पृथ्वीला धारण केलें आहे. सूर्यानें स्वर्गाला आधार दिला आहे. यज्ञानें देवांना जगविलें आहे. आणि सोम सर्वांच्यावर स्वर्गांत आहे.

२. सोमामुळें देव बलवान् आहेत. सोमामुळें पृथ्वीचा मोठेपणा आहे. म्हणून ह्या नक्षत्रांच्या मध्यें सोमाची स्थापना केली आहे.

सोमं मन्यते पपिवान्यत्संपिंषंत्योषधिम् ।
सोमं यं ब्रह्माणो विदुर्न तस्याश्नाति कश्चन ॥ ३ ॥
आच्छाद्विधानैर्गुपितो बार्हतैः सोम रक्षितः ।
ग्राव्णामिच्छृण्वन्तिष्ठसि न ते अश्नाति पार्थिवः ॥ ४ ॥
यत्त्वा देव प्रपिबंति तत आ प्यायसे पुनः ।
वायुः सोमस्य रक्षिता समानां मास आकृति ॥ ५ ॥
रैभ्यासीदनुदेयी नाराशंसी न्योचनी ।
सूर्याया भद्रमिद्वासो गाथयैति परिष्कृतम् ॥ ६ ॥
चित्तिरा उपबर्हणं चक्षुरा अभ्यंजनम् ।
द्यौर्भूमिः कोश आसीद्यदयात्सूर्या पतिम् ॥ ७ ॥
स्तोमा आसन्प्रतिधयः कुरीरं छंद ओपशः ।
सूर्याया अश्विना वराग्निरासीत्पुरोगवः ॥ ८ ॥

---

३. जी औषधी पिळून काढतात तिला पिणारे सोम मानतात. खरोखर ब्राह्मण जो सोम जाणतात त्याला कोणी खात नाहीं.

४. हे, सोमा गुप्तविधानांनीं रक्षण केलेला, बार्हत गण ( स्वान, भ्राज, अंघार्य इत्यादि ) यांनीं रक्षिलेला तूं, कुटणाऱ्या दगडांचा ध्वनि ऐकतच राहातोस. त्याला पृथ्वीवरचे लोक खात नाहींत.

५. हे सोमदेवा, ज्यावेळीं तुला लोक पितात त्यावेळीं तूं पुनः पुनः त्याला जातोस. जसें वर्ष पुरें करणारे महिने असतात त्याचप्रमाणें वायू सोमाचा रक्षणकर्ता आहे.

६. रैभी(कांहीं मंत्र)पाठराखणी होती. नाराशंसी(ऋचा) दासी होती. सूर्येचें वस्त्र चांगलेच हातें. तें गाथेनें सुशोभित केल्लें होतें. तेथें ती आली.

७. ज्यावेळीं सूर्या पतीच्या घरी गेलीं त्यावेळीं विचार गिर्दी होता, डोळ्याला काजळ होतें, आकाश आणि पृथ्वी तिचा खजिना होता.

८. सूक्तें उभ्या खांबाचीं आडवीं दांडकीं होतीं.कुरीर नांवाच्या छंद गाडी सुशोभित केली होती. दोघे अश्विनी पति होते.अग्नि यांचा पुढारीनं होता.

सोमो वधूयुरभवदश्विनास्तामुभा वरा ।
सूर्यां यत्पत्ये शंसंतीं मनसा सविताददात् ॥ ९ ॥
मनो अस्या अन आसीद् द्यौरासीदुत च्छदिः ।
शुक्रावनड्वाहावास्तां यदयात्सूर्या गृहम् ॥ १० ॥
ऋक्सामाभ्यामभिहितौ गावौ ते सामनावितः ।
श्रोत्रं ते चक्रे आस्तां दिवि पंथाश्चराचरः ॥ ११ ॥
शुची ते चक्रे यात्या व्यानो अक्ष आहतः ।
अनो मनस्मयं सूर्यारोहत्प्रयती पतिम् ॥ १२ ॥
सूर्याया वहतुः प्रागात्सविता यमवासृजत् ।
अघासु हन्यंते गावोऽर्जुन्योः पर्युह्यते ॥ १३ ॥
यदश्विना पृच्छमानावयातं त्रिचक्रेण वहतुं सूर्यायाः ।
विश्वे देवा अनु तद्वामजानन्पुत्रः पितरावबृणीत पूषा ॥ १४ ॥

---

९. जेव्हां पतीची इच्छा करणाऱ्या सूर्येला सविता मनःपूर्वक पतीला देता झाला, तेव्हां सोम कन्येच्छु होता. अश्विनी पति होते.

१०. ज्या वेळीं सूर्या नवऱ्याच्या घरीं गेली त्या वेळीं सूर्येचा रथ मनाचा होता. आकाशाचें छत्र होतें आणि (सूर्यचन्द्ररूपी) तेजस्वी बैल ओढणारे होते.

११. हे सूर्ये देवी, ऋग्वेद आणि सामवेदरूपी दोऱ्यांनीं बांधलेले (हे चन्द्रसूर्यरूपी) बैल शान्त होते (मनोरथ ओढून नेत आहेत.) तुझे कान चाकें आहेत आणि रथाचा मार्ग आकाशांत अत्यंत अस्थिर होता.

१२. जाणाऱ्या सूर्येच्या रथाचीं चाकें (कान) होतीं, आख वायु होता. पतीकडे जाणारी सूर्या मनोमय रथांत आरूढ झाली.

१३. सूर्याने जो आहेर सोमाकरितां दिलेला होता तो सूर्येच्या पूर्वी रवाना झाला होता. मघा नक्षत्रावर गाई हाणल्या जातात आणि फाल्गुनी वर (कन्या) पोचविली जाते.

१४. हे अश्विनीहो, तीन चाकी रथानें सूर्येच्या विवाहाबद्दल विचा

यद्यातं शुभस्पती वरेयं सूर्यामुप ।
क्वैकं चक्रं वामासीत्क देष्ट्राय तस्थथुः ॥ १५ ॥
द्वे ते चक्रे सूर्ये ब्रह्माणं ऋतुथा विदुः ।
अथैकं चक्रं यद्गुहा तदद्धातय इद्विदुः ॥ १६ ॥
सूर्यायै देवेभ्यो मित्राय वरुणाय च ।
ये भूतस्य प्रचेतस इदं तेभ्योऽकरं नमः ॥ १७ ॥
पूर्वापरं चरतो मायैतौ शिशू क्रीळन्तौ परि यातो अध्वरम् ।
विश्वान्यन्यो भुवनाभिचष्ट ऋतूरन्यो विदधज्जायते पुनः ॥ १८ ॥
नवोनवो भवति जायमानोऽह्नां केतुरुषसामेत्यग्रम् ।
भागं देवेभ्यो वि दधात्यायन्प्र चन्द्रमास्तिरते दीर्घमायुः ॥ १९ ॥

---

रण्याकरितां तुम्ही ज्या वेळीं आला होता त्यावेळीं सर्व देवांनीं तुम्हांला संमति दिली होती. अश्विनीचा पुत्र पूषा यांनींही कबूल केलें होतें.

१५. हे अश्विनीहो, सूर्येला भेटण्याकरतां सवित्याकडे ज्यावेळीं तुम्ही आला होतां त्यावेळीं तुमच्या रथाचें एक चाक कोठें होतें आणि सूर्येच्या दानाला प्रवृत्त झालेला होता त्या वेळीं तुम्ही कोठें रहात होता !

१६. हे सूर्ये, तुझीं दोन चंद्रसूर्यात्मक चाकें प्रत्येक ऋतूंत ब्राह्मण जाणीत होते. त्यापकीं एक तिसरें चाक जें गुप्त होतें तें फक्त शहाणे लोक जाणीत होते.

१७. सूर्येला, देवांना, मित्राला, वरुणाला आणि जे प्राणिमात्राला हितप्रद त्यांना मी नमस्कार करतो.

१८. पूर्व व पश्चिम दिग्भागांत स्वतःच्या तेजानें मुलासारखे क्रीडा करणारे हे चन्द्रसूर्य यज्ञांत येतात. त्यापकीं एक सर्व जगाकडे पहातो. आणि आणि दुसरा ऋतु निर्माण करीत पुनः उत्पन्न होतो.

१९. हा चंद्र दररोज नवा नवा असा उत्पन्न होतो. दिवसांचा सूचक असा सूर्य उषेच्या पुढें येतो. आणि देतांना देवांना हविर्भाग देतो. आणि दीर्घायुष्य वाढवितो.

सुकिंशुकं शल्मलिं विश्वरूपं हिरण्यवर्णं सुवृतं सुचक्रम् ।
आ रोह सूर्ये अमृतस्य लोकं स्योनं पत्ये वहतुं कृणुष्व ॥ २० ॥
उदीर्ष्वातः पतिवती ह्येषा विश्वावसुं नमसा गीर्भिरीळे ।
अन्यामिच्छ पितृषदं व्यक्तां स ते भागो जनुषा तस्य विद्धि ॥२१॥
उदीर्ष्वातो विश्वावसो नमसेळामहे त्वा ।
अन्यामिच्छ प्रफर्व्यं १ सं जायां पत्या सृज ॥ २२ ॥

( २३ ते २७ या ऋचा वाङ्निश्चयाला जाण्याच्या वेळीं म्हणतात. )

अनृक्षरा ऋजवः सन्तु पंथा येभिः सखायो यन्ति नो वरेयम् ।
समर्यमा सं भगो नो निनीयात्सं जास्पत्यं सुयममस्तु देवाः ॥२३॥
प्र त्वा मुंचामि वरुणस्य पाशाद्येन त्वाबध्नात्सविता सुशेवः ।
ऋतस्य योनौ सुकृतस्य लोकेऽरिष्टां त्वा सह पत्या दधामि ॥२४॥

---

२०. हे सूर्ये, शाल्मलिवृक्षाचा आणि रेशमीवस्त्रानें वेष्टिलेला, नाना आकार असलेला, चांगल्या चाकाचा आणि चांगला चालणारा असा हा रथ आहे. यामध्यें तूं बस, व अमृतरूप, सुखकर अशा सोमाला प्राप्त कर.

२१. हे विश्वावसो, ही कन्या पतीनें युक्त झाली आहे, म्हणून तूं कन्येजवळून ऊठ. विश्वावसूला नमस्कार करून आणि स्तुति करून मी स्तवितों. बापाच्या घरीं असलेली अशी अविवाहित दुसरी मुलगी पाहून तिची इच्छा कर. तो तुझा भाग आहे. ती जन्मापासून तुझी आहे असें समज.

२२. म्हणून हे विश्वावसो, येथून ऊठ. मी नमस्कार करून स्तवितो. तूं एखाद्या जास्त प्रौढ स्त्रीची इच्छा कर. मला नवऱ्याशीं युक्त कर.

२३. हे देवहो, ज्या मार्गानें आम्हां वराकडचे लोक कन्यापित्याकडे जातात ते मार्ग निष्कंटक सरळ असोत. अर्यमा भग आम्हाला चांगल्या प्रकारें पोंचवो. हे देवहो, हें नवराबायकोचें जोडपें चांगलें जोडपें असो.

२४. हे वधू, ज्यायोगें सुखी सविता ( पाशानें ) बांधिता झाला त्या वरुणाच्या पाशापासून तुला मी मुक्त करतों यज्ञस्थान अशा भूमीवर सुरक्षित अशा तुला पतीशीं युक्त करतों.

प्रेतो मुंचामि नामुतः सुबद्धाममुतस्करम् ।
यथेयमिन्द्र मीढ्वः सुपुत्रा सुभगासति ॥ २५ ॥
पूषा त्वेतो नयतु हस्तगृह्याश्विना त्वा प्र वहतां रथेन ।
गृहान्गच्छ गृहपत्नी यथासो वशिनी त्वं विदथमा वदासि ॥२६॥
इह प्रियं प्रजया ते समृध्यतामस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि ।
एना पत्या तन्वं १ सं सृजस्वाधा जिव्री विदथमा वदाथः ॥ २७
नीललोहितं भवति कृत्यासक्तिर्व्यज्यते ।
एधंते अस्या ज्ञातयः पतिर्बंधेषु बध्यते ॥ २८ ॥
परा देहि शामुल्यं ब्रह्मभ्यो वि भजा वसु ।
कृत्यैषा पद्वती भूत्वा जाया विशते पतिम् ॥ २९ ॥

---

२५. मीं तुला पितृकुलांतून मुक्त करतों. पण भर्तृकुलांतून मुक्त करीत नाहीं. तुला नवऱ्याच्या घरीं सुसंबद्ध करून टाकतों. हे बलिष्ठ इंद्रा, ही स्त्री ज्यायोगें पुत्रवती आणि भाग्यशाली होईल असें तूं कर.

२६. हात धरून पूषा तुला पोंचवो. अश्विनी तुला रथानें घेऊन जावोत. तूं घरां जा आणि घराची मालकीण हो. सर्वांना ताब्यात ठेवणारी तूं घराशीं ( घरांतील लोकांशीं ) आपलेपणानें बोल.

२७ हे मुली, तुझा पतिगृहीं मुलाबाळांनीं उत्कर्ष होवो. ह्या घरांत घरधनिणपणाविषयीं तूं जागृत रहा. ह्या पतीशीं तूं युक्त अस. या घरांत म्हातारी झाली असें म्हटली जा.

२८. अभिचारदेवता कृत्या तांबडी निळी आहे. अशी कृत्या वधूच्या शरीरांत राहते. तीस मी घालवितो. ती कृत्या गेली म्हणजे वधूचा संसार वाढतो व पतीचें लक्ष संसारांत वेधतें.

२९. हें शारीरिक मलानें मळकट असणार वस्त्र टाकून दे. ( प्रायश्चित्तार्थ ) ब्राह्मणांला धन दे. ही मळकट वस्त्ररूपी कृत्या पादयुक्त होऊन बायकोरूपानें नवऱ्याच्या शरीरांत प्रवेश करिते.

अश्रीरा तनूर्भवति रुशती पापयामुया ।
पतिर्यद्वध्वो ३ वाससा स्वमंगमभिधित्सते ॥ ३० ॥
ये वध्वश्चंद्रं वहतुं यक्ष्मा यंति जनादनु ।
पुनस्तान्यज्ञिया देवा नयंतु यत आगताः ॥ ३१ ॥
मा विदन्परिपंथिनो य आसीदंति दंपती ।
सुगेभिर्दुर्गमतीतामप द्रांत्वरातयः ॥ ३२ ॥
सुमंगलीरियं वधूरिमां समेत पश्यत ।
सौभाग्यमस्यै दत्त्वायाथास्तं वि परेतन ॥ ३३ ॥
तृष्टमेतत्कटुकमेतदपाष्ठवद्विषवन्नैतदत्तवे ।
सूर्यां यो ब्रह्मा विद्यात्स इद्वाधूयमर्हति ॥ ३४ ॥
आशसनं विशसनमथो अधि विकर्तनम् ।
सूर्यायाः पश्य रूपाणि तानि ब्रह्मा तु शुंधति ॥ ३५ ॥

---

३०. पति जर वधूच्या वस्त्रानें आपलें अंग झाकूं इच्छिल तर ह्या दुष्टेच्या ( कृत्येच्या ) संगतानें त्याचें तेजस्वी शरीर निस्तेज ( रोगी ) होईल.

३१ वधूकडून किंवा वधूकडच्या लोकांकडून जे रोग तेजःपुंज नवऱ्याकडे येतील त्या सर्व रोगांना यज्ञीय देव जेथून आले तेथें परत नेऊन पोंचवोत.

३२. जे वाटमारे नवराबायकोवर चालून येत आहेत, त्यांना नवरा व बायको न सांपडो. ते सहज व ईष्ट प्रदेशांत जाऊन पळोत. शत्रू दूर पळोत.

३३. ही वधू शुभप्रद आहे. हिच्याकडे या. ह्या मुलीला पाहा. भेटून-पाहून आशीर्वाद द्या आणि नंतर घरीं परत जा.

३४. हें वधूवस्त्र दाहक व घाणेरडें आहे. हें वाईट स्थितींत आहे. हें विषासारखें आहे. याचा कांहीं उपयोग नाहीं. जो ब्राह्मण सूर्येला चांगल्याप्रकारें जाणील तोच वधूवस्त्राला योग्य आहे.

३५. आशसन (झालर ), विशसन (शिरोभूषण) आणि अधिविकर्तन ( तीन भागांचा झगा ) अशी तीन तऱ्हेचीं वस्त्रें नेसलेली सूर्येचीं रूपें पहा. तीं ब्राह्मणच शुद्ध करूं शकतो.

गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ।
भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥ ३६ ॥
तां पूषञ्छिवतमामेरयस्व यस्यां बीजं मनुष्या वपंति ।
या न ऊरू उशती विश्रयाते यस्यामुशंतः प्रहराम शेपम् ॥ ३७ ॥
तुभ्यमग्रे पर्यवहन्त्सूर्यां वहतुना सह ।
पुनः पतिभ्यो जायां दा अग्ने प्रजया सह ॥ ३८ ॥
पुनः पत्नीमग्निरदादायुषा सह वर्चसा ।
दीर्घायुरस्या यः पतिर्जीवाति शरदः शतम् ॥ ३९ ॥
सोमः प्रथमो विविदे गंधर्वो विविद उत्तरः ।
तृतीयो अग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजाः ॥ ४० ॥
सोमो ददद्गंधर्वाय गंधर्वो ददद्ग्नये ।
रयिं च पुत्रांश्चादादग्निर्मह्यमथो इमाम् ॥ ४१ ॥

---

३६. हे वधू, मी तुझा हात ऐश्वर्यासाठीं ग्रहण करतो. मज पतीबरोबर तूं वृद्ध होईपर्यंत अस. भग, अर्यमा, सविता आणि पुरंधी ( उषा ) या देवतांनीं मला गृहस्थपणा प्राप्त व्हावा म्हणून तुला माझ्या स्वाधीन केली आहे.

३७. हे पूषन्, जी आमच्या मांड्यांच्या संभोगाची इच्छा करते आणि कामुक असणाऱ्या जिचें ठिकाणीं लिंगाघात करतात व जिचे ठिकाणीं मनुष्य रेतःस्खलन करतात, त्या अत्यंत सुंदर स्त्रीचें मन आमच्याकडे वळीव.

३८. हे अग्ने, गंधर्वानें सूर्या नजराण्यासह तुला प्रथम दिली, ( नंतर तूं सोमास दिलीस ) त्याप्रमाणें सध्यांहि फिरून ही स्त्री तूं प्रजेसह पतीला द्यावीस.

३९. अग्नीनें फिरून आयुष्य व तेज यांसह दिली. हिचा जो पति तो दीर्घायुषी होत्साता शंभर वर्षें जगो.

४०. प्रथम सोम, नंतर गंधर्व, तिसरा अग्नि, चवथा मनुष्य हा पति, तिला प्राप्त करतो आहे.

४१. सोमानें गंधर्वाला दिली, गंधर्व अग्नीला देता झाला, आणि अग्नि ही कन्या संततिसंपत्तीसह मला देवो.

इहैव स्तं मा वि यौष्टं विश्वमायुर्व्यश्नुतम् ।
क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे ॥ ४२॥
आ नः प्रजां जनयतु प्रजापतिराजरसाय समनक्त्वर्यमा ।
अदुर्मंगलीः पतिलोकमा विश शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥४३॥
अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यः सुमनाः सुवर्चाः ।
वीरसूर्देवकामा स्योना शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥ ४४ ॥
इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ।
दशास्यां पुत्राना धेहि पतिमेकादशं कृधि ॥ ४५ ॥
सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव ।
ननांदरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधि देवृषु ॥ ४६ ॥
समंजंतु विश्वे देवाः समापो हृदयानि नौ ।
सं मातरिश्वा सं धाता समु देष्ट्री दधातु नौ ॥ ४७

(ऋ. १०. ८५.)

---

४२. तुम्ही याच लोकीं असा, वियुक्त होऊं नका. संपूर्ण आयुष्य उपभोगा. पुत्रांशीं क्रीडा करणारे व नातवांनीं आनंदित असे तुम्ही स्वतःच्या घरीं असा.

४३. प्रजापति आम्हांला संतति देवो. अर्यमा आम्हांला म्हातारपण देवो. शुभ अशी तूं पतिसन्निध अस. आमच्या आप्तेष्टांना आणि जनावरांना सुख देणारी हो.

४४. हे वधू, तूं शांतदृष्टीची हो, पतीला घातक होऊं नकोस. पशूंना हितकर अस. तुझ्या मनांत चांगले विचार असूं दे. आणि तूं तेजस्वी अस. वीर प्रसवणारी, श्रद्धाळू आणि माझ्या आप्तेष्टांना व पशूंना सुख देणारी हो.

४५. हे इंद्रा, तूं ह्या मुलीला पुत्रयुक्त आणि भाग्यशाली कर. हिला दहा मुलगे आणि अकरावा पति असा संसार अर्पलेली कर.

४६. हे वधू, तूं सासूसासरे, दीरनणंदा यांच्यावर छाप ठेवणारी हो.

४७. सर्व देव तुमचीं मनें एक विचारानें युक्त करोत. उदक, वायु, धाता हे सर्व तुमची मनें जुळवोत आणि सरस्वतीहि तसेंच करो.

# अक्षतारोपणमन्त्राः

ओ॒म् ऋक् च वा इदमग्रं साम चास्तां सैव नाम ऋगासीदमो नाम साम सा वा ऋक्सामोपावदन्मिथुनं संभवाव प्रजात्या इति नेत्यब्रवीत्साम ज्यायान् वा अतो मम महिमेति ते द्वे भूत्वोपावदतां तेन प्रति च न समवदत तास्तिस्रो भूत्वोपावदँस्तात्तिसृभिः समभवद्यत्तिसृभिः समभवत्तस्मात्तिसृभिः स्तुवन्ति तिसृभिरुद्गायन्ति तिसृभिर्हि साम संमितं तस्मादेकस्य बह्वचो जाया भवन्ति नैकस्यै बहवः सहपतयो यद्वैतत्सा चामश्च समभवतां तत्सामाभवत्तत्साम्नः सामत्वं सामन् भवति य एवं वेद यो वै भवति यः श्रेष्ठतामश्नुते स सामन् भवत्यसामन्य इति हि निन्दन्ति ते वै पंचान्यद्भूत्वा पंचान्यद्भूत्वा कल्पेतामाहावश्च हिंकारश्च प्रस्तावश्च प्रथमा च ऋगुद्गथिश्च मध्यमा च प्रतिहारश्चोनिधनं च वषट्कारश्च ते यत्पंचान्यद्भूत्वा पंचान्यद्भूत्वा कल्पेतां तस्मादाहुः पांक्तो यज्ञः पांक्ताः पशव इति यदु विराजं दशिनीमभिसमपद्येतां तस्मादाहुर्विराजि यज्ञो दशिन्यां प्रतिष्ठित इत्यात्मा वै स्तोत्रियः प्रजानुरूपः पत्नी धाय्या पशवः प्रगाथो गृहाः सूक्तं स वा अस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च प्रजया च पशुभिश्च गृहेषु वसति य एवं वेद ॥ १ ॥

स्तोत्रियं शंसत्यात्मा वै स्तोत्रियस्तं मध्यमया वाचा शंसत्यात्मानमेव तत्संस्कुरुतेऽनुरूपं शंसति प्रजा वा अनुरूपः स उच्चैस्तरामिवानुरूपः शंस्तव्यः प्रजामेव तच्छ्रेयसीमात्मनः कुरुते धाय्यां शंसति पत्नी वै धाय्या सा नीचैस्तरामिव धाय्या शंस्तव्या प्रतिवादिनीहास्य गृहेषु पत्नी भवति यत्रैवं विद्वान् नीचैस्तरां धाय्यां शंसति प्रगाथं शंसति स स्वरवत्या वाचा शंस्तव्यः पशवो वै

स्वरः पशवः प्रगाथः पशूनामवरुध्या इंद्रस्य नु वीर्याणि प्रवोचामिति सूक्तं शंसति तद्वा एतत्प्रियमिंद्रस्य सूक्तं निष्कैवल्यं हैरण्यस्तूप मेतेन वै सूक्तेन हिरण्यस्तूप आंगिरस इंद्रस्य प्रियं धामोपागच्छत्स परमं लोकमजयदुपेंद्रस्य प्रियं धाम गच्छति जयति परमं लोकं य एवं वेद गृहा वै प्रतिष्ठासूक्तं तत्प्रतिष्ठिततमया वाचा शंस्तव्यं तस्माद्यद्यपि दूर इव पशूँल्लभते गृहानेवै नाना जिगमिषति गृहा हि पशूनां प्रतिष्ठा प्रतिष्ठा ॥ २ ॥ ( ऐ. ब्रा. १२.१३ )

## ( मंगलाष्टकें )

( १ ) लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चंद्रमा ।
गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवांगनाः ॥
अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधे ।
रत्नानिह चतुर्दश प्रतिदिनं कुर्यात्सदा मंगलम् ॥
( २ ) यं ब्रह्मावरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवैः ।
वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायंति यं सामगाः ॥
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो ।
यस्यान्तं न विदुः सुराः सुरगणा देवाय तस्मै नमः ॥
( ३ ) गंगा सिंधु सरस्वती च यमुना गोदावरी नर्मदा ।
कावेरी शरयू महेंद्रतनया चर्मण्वती वेदिका ॥
क्षिप्रा वेत्रवती महासुरनदी ख्याता च या गंडकी ।
पूर्णा पूर्णजलैः समुद्रसहिता कुर्वन्तु वो मंगलम्

## सामान्य.

१. हळदकुंकू. २. गंध. ३. अक्षता. ४. फुलें. ५. दूर्वा. ६. दर्भ. ७. उदबत्त्या. ८. दीप. ९. साखर. १०. कापूर. ११. विड्याचीं पानें. १२. अखंड सुपाऱ्या. १३. नारळ. १४. गुलालरांगोळी. १५. पल्लव. १६. गहूं किंवा तांदूळ.

## वाग्दान.

१. हळकुंडें. २. कलश. ३. साडीचोळी ( मुलीस देण्यास ). ४. दागिना ( सरी, मुलीस घालण्यास ) ५. पानें व सुपाऱ्या. ६. पूजासाहित्य. ७. आप्तइष्ट. ८. औक्षणाची तयारी.

## वरप्रस्थान.

•१ नवा धोतरजोडा. २. फुलांच्या माळा. ३. घोडा, पालखी किंवा गाडी. ४. मुंडावळ. ५. पोषाख. ६. आप्तइष्ट. ७. पांढरें छत्र.

## मधुपर्क.

१ मध. ( लहानवाटी ). २. दहि. ३. कांस्यपात्र. ४. विष्टर ( दर्भाची दोरी ). ५. जानवीं [ २ ]. ६. शेला. ७. आंगठी. ८. अक्षता [ कुंकू लावून ] ९. पळीपंचपात्री तांब्याताम्हण. १० पायधुण्यास पाणी. पायपुसण्यास रुमाल. गंध, पुष्प, फळें, सुपाऱ्या.

## गौरीहर

१. वधूवस्त्र [ अष्टपुत्री ] २. पाटावरवंटा. ३. कापसाचे सूत. ४ तांदूळ १ पाव ५. पंचोपचार पूजासाहित्य.

## परस्परनिरीक्षण

१. दोन शेर तांदूळ किंवा गहू. २. अन्तःपट [ चांगलें शुभवस्त्र ] ३. तांदूळ, गुळ व जिरें एकत्र करून [ चिमुटभर ] ४ दर्भ. ५. अक्षता ( कुंकू लावून ).

## कन्यादान

१. दागिने [ कन्येबरोबर द्यावयाचे असतील ते ] २. दर्भ, ३. अक्षतां ४. तांब्या, पंचपात्रे, पळी ताम्हण. ५. कांस्यपात्र. ६. वरदक्षणा. ७. अभि-

मंत्रित उदक. ८. उंबराचे कोवळे पल्लव. ९. कोरे कापसाचें सूत. १०. हळकुंड ११. लोंकर. १२. तांदूळ [ दोन ओंजळी ] १३. दूध. [ लहानशी वाटी ] १४. तूप. ( लहानशी वाटी ) १५. सुवर्ण. [ गुंजभर ] १६. फुलें. १७. पुष्पमाळा. १८. लगीन साडा [ चांगलें वस्त्र चोळी लुगडें ] १९. मंगळसूत्र. २०. सुपाऱ्या, हळकुंडे, लाडू.

### विवाह होम.

१. माती ( स्थंडिलास घमेलेभर ) २. सहाण. ३. साळीच्या लाह्या ( अच्छेर. ) ४. तांब्या. ५. आम्रपल्लव, गंध, फुलें. ६. तांदूळ. १ शेर. ७. तूप ( अदपाव होमाकरतां ) ८. सूप. ९. फुंकणी. १० समिधा-लाकडे गोऱ्या. ११. गोमय.

### गृहप्रवेशनीय होम.

१. बैलाचे कातडें. २. तूप ( छटाक ).

### ऐरिणिप्रदान.

१ ऐरिणी ( १६ लहानसुपे व १ डाली ) २ आंब्यांचे डहाळे ३ पिठाचे दिवे ४ खण २

वरीलप्रमाणें प्रत्येक ठिकाणीं साहित्य अगाऊ तयार ठेवलें पाहिजे. तरच विधि यथासांग व शांतपणें होऊं शकतात. सुटे पैसे, नाणे हे नेहमीं तयार ठेवावें. धर्मविधींत किती पैसे खर्च करावयाचे हें अगाऊ ठरविलेलें असावें. व तशी उपाध्यायाशींहि वाटाघाट करून ठेवावी.म्हणजे प्रत्येक वेळीं घोटाळा होत नाहीं. मागाहून देऊं सध्या चालूं द्या असेंहि करूं नये. विवाहांत चनीच्या बाबतींत आपण ज्या मानानें खर्च करतो त्या मानानें भिक्षुकांस सढळ हातानें दक्षणा द्यावी. साधारण लग्नांत भिक्षुकास कमींतकमी रोख पंचवीस रुपये तरी मिळावेत.

---

## विवाहसंस्कार-सूचि

ॐ

# नित्यकर्ममाला

पुष्प तिसरें

# वैश्वदेव.



लेखक

विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

आवृत्ति ४ थी ] [ शके १८४९

किंमत २ आणे

# अनुक्रमणिका.

---



---


मुद्रक व प्रकाशक

**शंकर रामचंद्र दाते**, लोकसंग्रह छापखाना; २७ बुधवार पेठ, पुणें.

## I.

वदेवं समाचरेत् ।

वु आश्व० स्मृति १। ११६

**वैश्वदेव म्हणजे काय ?**—विश्व म्हणजे सर्व व देव म्हणजे देवता. सर्व देवतांना उद्देशून ज्या आहुति दिल्या जातात, त्यास वैश्वदेव असें म्हणतात. पंचमहायज्ञांपैकीं ब्रह्मयज्ञ खेरीजकरून बाकीचे चारहि यज्ञ वैश्वदेवांत अंतर्भूत आहेत. त्या चार यज्ञांचीं नांवें देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृ-यज्ञ आणि अतिथियज्ञ अशीं होत. अतिथियज्ञालाच मनुष्ययज्ञ म्हणतात.

**वैश्वदेव कोणी करावा ?**—पंचमहायज्ञ मुंज झालेल्या माणसानें करावेत. जर पुष्कळ भाऊ एकत्र रहात असतील तर थोरल्या भावानें वैश्वदेव करावा. वेगवेगळे रहात असल्यास वेगवेगळा करावा. सर्व भाऊ एकत्र असून वेगवेगळ्या गांवीं जर रहात असतील, तर वैश्वदेव वेगवेगळा केला पाहिजे. पिता किंवा वडील भाऊ कांहीं कारणानें वैश्वदेव करण्यास असमर्थ झाल्यास त्यांच्या आज्ञेनें धाकट्या भावानें करावा. परंतु कोणत्याहि कारणानें भिन्न स्वयंपाक करण्याची वेळ आली असतां वैश्वदेव केल्याशिवाय कोणीहि अन्नभक्षण करूं नये. वैश्वदेव येत नसल्यास किंवा कोणत्याहि कारणानें होणें शक्य नसल्यास निदान बोराएवढी आहुति अग्नींत द्यावी. वैश्वदेव केल्याशिवाय अन्न शुद्ध झालें असें समजूं नये. भटजी किंवा इतर कोणाकडून वैश्वदेव करविणें शास्त्रसंमत नाहीं; तथापि अडचणीच्या वेळीं मुख्य यजमानाच्या संमतीनें दुसऱ्यानें केल्यास चालतो.

**वैश्वदेव केव्हां करावा ?**—वैश्वदेव सकाळीं आणि संध्याकाळीं करावा. देवपूजा झाल्यानंतर वैश्वदेव करावा. वैश्वदेव केल्याशिवाय देवाला नैवेद्य अर्पण करूं नये. कारण वैश्वदेव अन्नशुद्धीकरितां असतो. वैष्णव लोकांमध्यें मात्र आधीं नैवेद्य आणि नंतर वैश्वदेव अशी चाल आहे. सायंकाळीं वैश्वदेव संध्या झाल्यावर करावा. दोन्ही वेळचा वैश्वदेव एकदांच

करण्याची चाल प्रचारांत आहे. म्हणून आम्ही तीच पद्धति दिली आहे. वैश्वदेव दिवसां दोन वेळां करूं नये किंवा रात्रींहि दोनदां करूं नये.

**वैश्वदेव कोठें करावा ?**--वैश्वदेव घराच्या मध्यभागीं करावा. जागा शुद्ध असावी. अशुद्ध वस्तूचें सान्निध्य किंवा संपर्ग तेथें असूं नये. पूर्वेकडे तोंड करून अग्नि तांब्याच्या किंवा मातीच्या कुंडांत घेऊन बसावें. चुलींत, लोखंडी भांड्यांत, व जमीनीवर किंवा खापरांत वैश्वदेव करूं नये. जमिनीवर बसून भिंतीला टेकून वैश्वदेव करूं नये.

**वैश्वदेवाला अग्नि व अन्न कोणतें घ्यावें ?**—स्मार्ताग्नि घरांत असल्यास त्या अग्नीवर वैश्वदेव करावा. नसल्यास ज्या अग्नीवर स्वयंपाक झाला असेल त्या अग्नीवर वैश्वदेव करावा.

जें अन्न शिजविलेलें असेल तें अन्न वैश्वदेवाला घ्यावें. मात्र खारट, अंबट, तिखट, तेलकट अशा अन्नाचा वैश्वदेव करूं नये. घृतामिश्रित अन्न वैश्वदेवाला घ्यावें. घृत न मिळाल्यास दही किंवा दूध यांनीं मिश्रित अशा अन्नाचा वैश्वदेव करावा. सामान्यत: आपल्या इकडे वैश्वदेवाला भात घेतात. कांहीं प्रसंगीं तांदुळाचाही वैश्वदेव करतात. परंतु हा प्रचार एकादशी वगैरेसारख्या दिवसाकरितां आहे. मुख्य अन्नाचा वैश्वदेव केल्या-नंतर इतर अन्नाचा वैश्वदेव केला नाहीं तरी तें शुद्ध झालें असें समजावें.

**भूतयज्ञ, बलिहरण, पितृयज्ञ आणि अतिथियज्ञ—** बलिहरण आणि भूतयज्ञ हे एकच होत. देवतापेक्षां कमी प्रतीच्या आणि मनुष्यापेक्षां जास्त सामर्थ्यसंपन्न अशांकरितां भूतयज्ञ किंवा बलिहरण हें आहे. त्यांत जीं देवतांचीं नांवें आलीं आहेत त्याचें कारण त्या देवतांचा भाग ज्यामध्यें जास्त आहे, असे सामर्थ्यवान् जीव तेथें उद्दिष्ट आहेत. 'स्वधा पितृभ्य: श्यामाय शबलाय' हा पितृयज्ञ. पितृयज्ञ करण्याचे वेळीं प्राचीनावीति करावी. प्राचीनावीति म्हणजे उजव्या खांद्यावरून डाव्या हाताखालीं जानवें आणणें. 'सनकादिमनुष्येभ्यो हन्त' हा अतिथियज्ञ. [1]हन्त शब्दाचा अर्थ सोळा ग्रास असा आहे. आपणांस

---

१ ग्रासमात्रा भवेद्भिक्षा अग्रं ग्रासचतुष्टयम् ।
अग्रं चतुर्गुणीकृत्य हन्तकारोऽभिधीयते ॥

सामर्थ्य नाहीं म्हणून आपण एक ग्रास देतों. बाहेर अतिथि मिळाल्यास आतिथियज्ञ प्रत्यक्ष होत असतो. तो करण्यास सामर्थ्य नाहीं म्हणून शास्त्रकारांनीं असा अतिथियज्ञ सांगितला आहे. काकबलिहि भूतयज्ञांतीलच एक भाग आहे. बलिहरणाकरितां जमीन सपाट असावी. अग्नीच्या उत्तर बाजूला बलिहरण घालावें. बलिहरणाकरितां ज्या आहुती द्यावयाच्या त्या पूर्वीप्रमाणेंच बोराएवढाल्या द्याव्यात. त्यामध्यें तूप घातलेलें असावें. भूतयज्ञ झाल्यावर घराच्या बाहेर अतिथीची गांठ पडण्याचा संभव आहे, अशा ठिकाणीं उभें राहून गाईची धार काढण्यास जितका वेळ लागतो, तितका वेळ अतिथीची वाट पहात उभें रहावें आणि नंतर हातपाय धुवून आचमन करावें आणि घरांत जावें जर कोणी अतिथि भेटला, तर त्याला सत्कारपूर्वक भोजन घालावें. ‘ **अतिथिदेवो भव** ’ तैत्तिरीय उप०

येणेंप्रमाणें वैश्वदेवांत ब्रह्मदेवापासून कृमिकीटकापर्यंत यच्चयावत् भूतमात्रांना संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला जातो. यावरून वैदिक संस्कृतींत अहिंसेचें तत्त्व किती खोलपर्यंत गेलेलें आहे; हें कोणाच्याहि ध्यानांत येईल. व त्याचप्रमाणें जीवाची व्याप्तिहि कळेल. ‘ अहिंसा, अहिंसा ’ असें तोंडानें न म्हणतां प्रत्येक धर्मघटकाच्या सर्व साधारण व्यवहारामध्यें ही गोष्ट कशी रुजली जाईल, ह्या गोष्टीकडे वैदिक महर्षींचें लक्ष वेधलें होतें असें दिसतें आणि ह्याच दृष्टीनें तत्त्वशोधनापेक्षां तत्त्वप्रचाराकडे लक्ष देऊन त्यांनीं वैश्वदेवासारखीं कर्में लोकांच्या नित्यकर्मांत घातलीं

पुष्कळ धर्मकृत्यांचीं स्वरूपें अनेक ग्रंथकारांनीं पुढें कलुषित करून टाकलीं असें अनेक लोक म्हणतात. या दृष्टीनें पाहूं गेलें असतां वैश्वदेवाच्या स्वरूपामध्यें प्राचीन कालापासून आतांपर्यंत विशेष फरक आलेला आहे असें आपणांस म्हणतां येणार नाहीं. ( पुढें आम्ही जो वैश्वदेवाचा प्रकार दिला आहे, तो विशेषतः गृह्यसूत्राला धरून आहे. जो काय फरक आढळेल तो बलिहरणांत आढळेल. ) बलिहरण हें घरांतल्या वेगवेगळ्या स्थळीं बलि देऊन केलें जात असे असें मनुस्मृति ( ३-८८ ) व महाभारत यांवरून दिसतें. मृच्छकटिक नाटकांतहि ह्या प्रकाराचें वर्णन आहे. परंतु बलिहरणामध्यें पुढें संक्षेप करण्यांत आला. व वैश्वदेवाचा विधि

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे दररोज करण्यास कधींच चुकत नसत, जसें जुन्या वर्णनावरून दिसतें. महाभारताच्या उपसंहारांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

" वैश्वदेवाचा विधि महाभारतकाळीं बहुतेक हल्लीप्रमाणेंच होता असें दिसतें. अनुशासनपर्व अ० ९७ यांत जो वैश्वदेव म्हणूनच वर्णिला आहे, त्यांत अग्नींत आहुति त्या त्या देवतांस उद्देशून देणें, बलिहरण गृहाच्या निरनिराळ्या भागांत करणें आणि गृहद्वारीं ' **श्वभ्यश्च श्वपचेभ्यश्च वयोभ्यश्चावपद्भुवि ।** ' बलि कुत्र्यांना वगैरे देणें सांगितलें आहे आणि हा वैश्वदेव सायंप्रातः करण्याचा असून सर्व गृहस्थांना नित्य आहे. ह्या वेळीं अतिथि घेण्यासही सांगितलें आहे. सारांश, बलि निरनिराळ्या भागांत देण्याचा विधि मात्र जास्त होता. "

प्रत्येक शाखेच्या आहुती व बलिहरण यांत बराच फरक आढळून येतो. तथापि हीं सर्व कृत्यें एकाच तत्त्वावर उभारलेलीं आहेत, हें आम्ही लवकरच दाखवणार आहोंत.

नागपंचमी, }
१८४९ }

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.

श्रीः

# वैश्वदेवः।

( अग्नेः पश्चात्प्राङ्मुख उपविश्य )

१ **आचमनम्**—ॐ केशवाय नमः । नारायणाय नमः । माधवाय नमः । गोविंदाय नमः । विष्णवे नमः। मधुसूदनाय नमः । त्रिविक्रमाय नमः । वामनाय नमः । श्रीधराय नमः । हृषीकेशाय नमः । पद्मनाभाय नमः । दामोदराय नमः । संकर्षणाय नमः । वासुदेवाय नमः । प्रद्युम्नाय नमः । अनिरुद्धाय नमः । पुरुषोत्तमाय नमः । अधोक्षजाय नमः । नारसिंहाय नमः । अच्युताय नमः । जनार्दनाय नमः । उपेंद्राय नमः । हरये नमः । श्रीकृष्णाय नमः ॥

---

अग्नीला पुढें घेऊन पूर्वेकडे तोंड करून बसावें.

**आचमनम्**-पहिल्या तीन नांवांनीं एक एक पळी पाणी उजव्या तळहातावर घेऊन प्राशन करावें आणि चवथ्या नांवानें हात धुवावेत.

आचमन म्हणजे उदक प्राशन करणें. आचमन अनेक प्रकारचें आहे. आणि आचमनाच्या पद्धतीहि अनेक आहेत. सर्वप्रसिद्ध पद्धति वर दिली आहे. आचमन करितेवेळीं गोकर्णाकृति हातांत उदक घेऊन ब्रह्मतीर्थानें आचमन करावें. ( आंगठा आणि आंगठ्याजवळील बोट यांचा संयोग करून बाकीचीं तीन बोटें लांब केलीं असतां गोकर्णाकृति होते. तसेंच आंगठ्याचा आरंभ अथवा तळहाताच्या आरंभाचा मध्य याला ब्रह्मतीर्थ म्हणतात. ) संध्यावंदनादि सर्व धार्मिक कृत्याला तांब्याचें भांडें, निदान पळी तांब्याची असावी. आचमन थंड पाण्यानें करावें. ऊन पाण्यानें करूं नये. केंस, केर, माती, बुडबुड वगैरेनीं युक्त असलेलें व डाव्या हातानें आणलेलें पाणी अशुद्ध समजावें. प्रत्येक आचमनाला वेगळी पळी भरून पाणी घ्यावें.

२ प्राणायामः—प्रणवस्य परब्रह्म ऋषिः । परमात्मा देवता । दैवी गायत्री छन्दः । सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्र-जमदग्नि-भरद्वाजगौतमात्रि-वसिष्ठ-कश्यपा ऋषयः । अग्निवाय्वादित्य-बृहस्पतिवरुणेन्द्रविश्वेदेवा देवताः ।गायत्र्युष्णिगनुष्टुब्बृहतीपंक्तित्रिष्टुब्जगत्यश्छन्दांसि । गायत्र्या विश्वामित्र ऋषिः । सविता देवता । गायत्री छन्दः । गायत्रीशिरसः प्रजापतिर्ऋषिः । ब्रम्हाग्निवाय्वादित्या देवताः । यजुश्छन्दः । प्राणायामे विनियोगः ।

ॐ भूः ॐ भुवः ॐ स्वः ॐ महः ॐ जनः ॐ तपः ॐ सत्यम् । ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ।ॐ आपो ज्योतीरसोमृतं ब्रह्म भूर्भुवःस्वरोम् ॥

---

प्राणायाम--प्रणव म्हणजे ओंकार, त्याचा परब्रह्म हा ऋषि, परमात्मा ही देवता आणि गायत्री हा छन्द होय. भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं ह्या सात व्याहृति होत. यांचे अनुक्रमानें विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ आणि कश्यप हे ऋषि. अग्नि, वायु, आदित्य, बृहस्पति, वरुण, इंद्र आणि विश्वेदेव ह्या देवता. गायत्री उष्णिक्, अनुष्टप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप् आणि जगती हे छंद आहेत. गायत्रीमंत्राचा विश्वामित्र ऋषि, सविता ही देवता, आणि गायत्री हा छंद आहे. ' आपोज्योतीरसोमृतम् ' हें गायत्रीशिर होय. गायत्रीशिराचा प्रजापति हा ऋषि, ब्रह्मा, अग्नि, वायु आणि आदित्य ह्या चार देवता, यजुः हा छंद आहे. या चारही मंत्रांचा उपयोग प्राणायामाकडे करितात. प्राणायामाचा प्रकार संध्येंत पहा. ( पा. २ )

---

२ ' प्राण ' म्हणजे श्वासवायु व आयाम म्हणजे निरोध. श्वासवायूच्या निरोधाला ' प्राणायाम ' म्हणतात.

**३ संकल्पः**—पञ्चसूनादोषपरिहारार्थं[1] तद्द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायंप्रातर्वैश्वदेवाख्यं[2] कर्म करिष्ये ।

**४ आवाहनम्**—जुष्टो दमूना आत्रेयो वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप्।। एह्यग्ने राहुगणो गोतमोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ अग्न्यावाहने विनियोगः ॥

**ॐ जुष्टो दमूना अतिथिर्दुरोण इमं नो यज्ञमुप याहि विद्वान् ॥ विश्वा अग्ने अभियुजो विहत्या शत्रूयतामाभरा भोजनानि ॥ एह्यग्न इह होता निषीदादब्धः सुपुर एता भवा नः ॥ अवतां त्वा रोदसी विश्वमिन्वे यजामहे सौमनसाय देवान् ॥**

( इत्यक्षतैरावाह्य आच्छादनं दूरीकृत्य )

---

**संकल्प**—पंचसूनादोष नाहींसे होण्याकरितां आणि तद्द्वारा परमेश्वर प्रसन्न होण्याकरितां सकाळ संध्याकाळचा मिळून वैश्वदेव करितों, असा संकल्प सोडून वैश्वदेवाला आरंभ करावा.

**आवाहन**—जुष्टो दमूना या मंत्राचा अत्रि कुलांतील वसुश्रुत हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप हा छंद होय.

अह्यग्ने या मंत्राचा राहूगण वंशांतील गोतम हा ऋषि, अग्नि देवता आणि त्रिष्टुप छंद होय. अग्नीला बोलावण्याकरितां या मंत्राचा उपयोग आहे.

---

१ मनुष्याचे हातून पांच प्रकारानें हिंसा दररोज होत असते. उखळामध्यें कांडणें, जात्यानें दळणें, चुलीमध्यें अग्नि सिद्ध करणें,पाणी आणणें आणि सुपानें पाखडणें, हे ते पांच प्रकार होत. हीं पांच कृत्यें मनुष्यास अवश्य लागतात. त्यामुळें अनेक प्राणिमात्रांची हिंसा घडते. हें पातक दूर व्हावें एवढ्याकरितां वैश्वदेव करण्यास सांगितला आहे.

२ दररोज वैश्वदेव सकाळीं आणि संध्याकाळीं करावयाचा असतो. परंतु बहुतेक लोक दोन्ही वेळचा मिळून एका वेळीं दुपारींच करतात. आपणांस ज्याप्रमाणें इष्ट असेल त्याप्रमाणें संकल्प सोडावा. जर दोन्ही वेळां वेगळा वैश्वदेव करावयाचा असेल तर सकाळीं 'प्रातः' आणि संध्याकाळीं ' सायम् ' असें संकल्पांत म्हणून दोनही वेळीं वेगळा वैश्वदेव करावा.

५ **अग्निस्थापना**——समस्तव्याहृतीनां परमेष्ठी प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ।। अग्निप्रतिष्ठापने विनियोगः ।।ॐ भूर्भुवःस्वः रुक्मकनामानमग्निं प्रतिष्ठापयामि ।। ( प्रोक्षितेन्धनानि निक्षिप्य वेणुधमन्या प्रबोध्य ध्यायेत् )

६ **ध्यानम्**——चत्वारि शृंगा गौतमो वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप ।। अग्निमूर्तिध्याने विनियोगः ।। ॐ **चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्तहस्तासो अस्य ।। त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्याँ आविवेश ।। सप्तहस्तश्चतुःशृंगः सप्तजिह्वो द्विशीर्षकः ।। त्रिपात्प्रसन्नवदनः सुखासीनः शुचिस्मितः ।। स्वाहां तु दक्षिणे पार्श्वे देवीं वामे स्वधां तथा ।। बिभ्रद्दक्षिणहस्तैस्तु शक्तिमन्नं स्रुचं स्रुवं ।। तोमरं व्यजनं वामैर्घृतपात्रं च धारयन् ।। मेषारूढो जटाबद्धो गौरवर्णो महौजसः ।।**

---

अतिशय उदार, असा तूं विद्वान् अतिथिप्रमाणें पूज्य होत्साता आमच्या यज्ञरूपी घरांत ये आणि हे अग्ने, सर्व शत्रूंना नाहींसे करून त्या शत्रूंची धन्यधान्यादि हरण कर.

हे अग्ने, ये आणि देवांना बोलावणारा तूं येथें बैस. बसून आमचा चांगला मार्गदर्शक आणि कायमचा पुढारी हो. हे अवाढव्य असणारे उभय लोक तुझें संरक्षण करोत. आम्ही ( तुझ्या द्वारें ) देवांची कृपा संपादन करण्याकरितां देवांना पूजितों. ( असें म्हणून अक्षता वाहून अग्नीला बोलवावें आणि अग्नीवरचें आच्छादन दूर करावें. )

**अग्निस्थापना**.—समस्त व्याहृतींचा परमेष्ठी प्रजापति हा ऋषि, प्रजापति देवता आणि बृहती हा छंद होय. अग्नीच्या स्थापनेकडे उपयोग. नंतर समस्तव्याहृती म्हणून रुक्मक नामक अग्नीची मी स्थापना करतों, अशा अर्थाचा वरील मन्त्र म्हणून ( प्रोक्षण करून लांकडें गोंगी वगैरे अग्नींत घालुन वेळूच्या फुंकणीनें फुंकून ज्वाला उत्पन्न करावी. ) ‘ चत्वारि शृंगा ’ या मंत्रानें ध्यान करावें.

धूम्रध्वजो लोहिताक्षः सप्तार्चिः सर्वकामदः । आत्माभिमुख-मार.... ....ो हुताशनः ।

अग्ने वैश्वानर शांडिल्यगोत्र मेषध्वज प्राङ्मुखो देव मम संमुखो वरदो भव ॥

( इति ध्यात्वा परिसमूहनपर्युक्षणे कृत्वा )

---

**ध्यानम्**—' चत्वरि शृंगा ' या मंत्राचा वामदेव हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप् हा छंद होय. अग्नीच्या ध्यानाकडे उपयोग. या अग्नीला चार देवरूपी चार शिंगें आहेत. उदात्त, अनुदात्त, आणि स्वरित हे तीन पाय आहेत. ब्रह्मौदन आणि प्रवर्ग्य हे दोन यज्ञ त्याचीं मस्तकें आहेत. सात छंद हे सात हात आहेत. तीनही लोकांत असणारा आणि वर्षाव करणारा अग्नि अत्यंत स्तविला जातो. असा हा मोठा देव यज्ञांत यजमान प्रज्वलित करितात. या अग्नीस, सात हात, चार शिंग, सात जिभा, दोन मस्तकें आणि तीन पाय आहेत. त्याचें मुख प्रसन्न असून सदोदित हंसत असतें. आणि तो सुखानें बसलेला असतो त्याच्या उजव्या बाजूस स्वाहा आणि डाव्या बाजूस स्वधा आहेत. उजव्या हातांनीं शक्ति, अन्न, स्रुच, स्रुव हीं त्यानें धारण केलीं आहेत. आणि डाव्या हातांनीं तोमर, व्यजन, आणि घृतपात्र हीं त्यानें धारण केलीं आहेत. असला माझ्या समोर बसलेला अग्नि आहे.

हे सर्व मनुष्यास व्यापून असणाऱ्या अग्ने तुझें गोत्र शांडिल्य आहे. तूं बोकडावर बसलेला आहेस. तुझें तोंड पूर्वेकडे आहे. अशा हे अग्नि देवा, तूं आमच्या सन्मुख आणि आम्हांस चांगले वर देणारा असा हो.

---

१ **परिसमूहन आणि पर्युक्षण**—ईशान्येस आरंभ करून चौकोनी उताणें हातानें जमिनीला हात लावून पाणी फिरविणें यास परिसमूहन असें म्हणतात. हें पाणी कुंडापासून आठ अंगुलीवर फिरवावें परिसमूहन तीनदां करावें पर्युक्षण म्हणजे वरीलप्रमाणें पाणी फिरविलेल्या जागींच जमिनीस हात न लावतां पाणी फिरविणें यास पर्युक्षण असें म्हणतात. हेंहि वरील प्रमाणें तीनदां करावयाचें असतें.

७ **पूजनम्**—विश्वानिन इति तिसृणामात्रेयो वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप्। द्वयोरर्चनेंऽत्याया उपस्थाने विनियोगः ॥

**ॐ विश्वानि नो दुर्गहा जातवेदः ॥ १ ॥ ॐ सिंधु न नावा दुरितातिपर्षि ॥ २ ॥ ॐ अग्ने अत्रिवन्नमसा गृणानः ॥ ३ ॥ ॐ अस्माकं बोध्यविता तनूनां ॥४॥ ॐ यस्त्वा हृदा कीरिणा मन्यमानः ॥ ५ ॥ ॐ अमर्त्यं मर्त्यो जोहवीमि ॥ ६ ॥ ॐ जातवेदो यशो अस्मासु धेहि ॥ ७ ॥ ॐ प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्यां ॥ ८ ॥**

---

येणेंप्रमाणें अग्नीचें ध्यान करून अग्नीच्या ईशान्य दिशेला आरंभ करून प्रदक्षिण असें अग्नीला तीन वेळ पाण्याचें चोकोनी परिसमूहन करावें; आणि त्याप्रमाणें तीन वेळ परिषेचन करावें. आणि पुढील मंत्र म्हणून प्रत्येक ऋचेनें अग्नीच्या भोंवतीं चोकोनी केलेल्या परिसमूहनावर पूर्व भागाच्या मध्यापासून अक्षता ठेवण्यास सुरवात करावी. पूर्वेच्या मध्यापासून क्रमानें मध्यें आणि कोपऱ्यावर अक्षता ठेवाव्यात[१].

**पूजनम्**—'विश्वानि नः' या मंत्राचा अत्रिकुलांतील वसुश्रुत हा ऋषि, अग्नि देवता, त्रिष्टुप हा छन्द होय. शेवटल्या दोन ऋचा स्तुतीकरितां आणि बाकीच्या पूजनाकरितां उपयोगी आहेत.

( १ ) हे अग्ने, आम्हाला भोगण्यास कठिण असणाऱ्या सर्व पातकांतून ( २ ) नावाडी समुद्राच्या पार नेतो त्याप्रमाणें पार पाड. ( ३ ) हे अग्ने, अत्रि ऋषीप्रमाणें आम्हांला स्तविला जाणारा ( ४ ) तूं आमच्या शरीराचा रक्षक आहेस. ( ५ ) मर्त्य असणारा मी अमर असणाऱ्या ( ६ ) तुला स्तुतियुक्त अंतःकरणानें बोलावितों. ( ७ ) हे जातवेद अग्ने, आम्हाला यश प्राप्त होऊं दे. ( ८ ) आणि प्रजेनें आम्ही अमरपणाला प्राप्त व्हावें.

१ प्रत्येक दिशेस अक्षता ठेवण्याकरितां ओळीनें एक एक मंत्राचा उपयोग करावा. अक्षता आठ दिशेस ठेवावयाच्या असतात. त्याप्रमाणें मंत्रहि आठ आहेत. ह्या अक्षता परिसमूहनापासून तीन अंगुळें पुढें ठेवाव्यात तथापि सर्वत्र प्रचार परिसमूहनावर अक्षता ठेवण्याचा आहे.

८ उपस्थानम्-ॐ यस्मै त्वं सुकृते जातवेद उ लोकमग्ने कृणवः स्योनम् ॥ अश्विनं सपुत्रिणं वीरवंतं गोमंतं रयिं नं शते स्वस्ति ॥

( आत्मानं चालंकृत्य हस्तं प्रक्षाल्य सिद्धमन्नमग्नावाधिश्रित्य उदगुद्रास्य, प्रोक्ष्य, अग्नेः पश्चिमतो निधायाभिघार्य त्रिधा विभज्य सव्यं पाणितलं हृदि न्यस्य दक्षिणहस्तेन दक्षिणभागादार्द्रामलकमितमन्नमादायांगुष्ठाग्रेण पीडितं संहतांगुल्युत्तानपाणिना प्रणवादिरहितैः स्वाहांतैः सूर्यादिमंत्रैर्जुहुयात् ) ॥

९ आहुतिप्रदानम्-१ सूर्याय स्वाहा । सूर्यायेदं न मम ॥ २ प्रजापतये स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥ ३ अग्नये स्वाहा । अग्नय इदं न मम ॥ ४ प्रजापतये स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥ ५ सोमाय वनस्पतये स्वाहा । सोमाय वनस्पतय इदं न मम ॥ ६ अग्नीषोमाभ्यां स्वाहा। अग्नीषोमाभ्यामिदं न मम ॥ ७ इंद्राग्निभ्यां स्वाहा । इंद्राग्निभ्यामिदं न मम ॥ ८ द्यावापृथिवीभ्यां स्वाहा । द्यावापृथिवीभ्यामिदं न मम ॥ ९ धन्वन्तरये स्वाहा । धन्वन्तरय इदं न मम ॥ १० इंद्राय स्वाहा । इंद्रायेदं न मम ॥ ११ विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा । विश्वेभ्यो देवेभ्य इदं न मम ॥ १२ ब्रह्मणे स्वाहा । ब्रह्मण इदं न मम॥

---

**उपस्थान**—हे अग्ने, तूं ज्या सुकर्म करणाऱ्या यजमानाला सुखी करतोस, त्याला पुष्कळ घोडे, पुत्र, सामर्थ्य, गाई, बैल यांनीं युक्त असें धन प्राप्त होवो. ( नंतर हविर्योग्य शिजविलेलें अन्न एका पात्रावर किंवा पानावर उकरून घेऊन तें पात्र अग्नीवर तापवून प्रोक्षण करून कालवून अग्नीच्या पश्चिमेस ठेवावें. आणि तीन भाग करून तूप घालून छातीवर डावा हात ठेवून उजव्या बाजूच्या अन्नांतून बोटांनीं ओल्या आवळ्याएवढें अन्न घेऊन ओंकार न म्हणतां शेवटीं स्वाहा म्हणून पुढील आहुति द्याव्यात. आहुति टाकूं नयेत, फेकूं नयेत, अर्पण केल्यासारख्या द्याव्यात.

१३ भूः स्वाहा । अग्नय इदं न मम ॥ १४ भुवः स्वाहा । वायव इदं न मम ॥ १५ स्वः स्वाहा । सूर्यायेदं न मम ॥ १६ भूर्भुवः स्व स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥

( इति हुत्वा परिसमूहनपर्युक्षणे कृत्वा विश्वानिन इत्यलंकृत्य )

१० **विभूतिग्रहणम्ः**—मानस्तोक इत्यस्य कुत्सो रुद्रो जगती विभूतिग्रहणे विनियोगः ।

**ॐ मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ॥ वीरान्मा नो रुद्रभामितो वधीर्हविष्मंतः सदामित्त्वा हवामहे ॥** त्र्यायुषं जमदग्नेः ललाटे ॥ कश्यपस्य त्र्यायुषं कंठे ॥ अगस्त्यस्य त्र्यायुषं नाभौ ॥ यद्देवानां त्र्यायुषं दक्षिणस्कंधे ॥ तन्मे अस्तु त्र्यायुषं वामस्कंधे ॥ सर्वमस्तु शतायुषं शिरसि ॥

---

**विभूति ग्रहणः**—'मानस्तोके' या मंत्राचा कुत्स हा ऋषि, रुद्र ही देवता आणि जगती हा छंद होय.

हे रुद्रा, आमचीं मुलें, नातू आमचे संबंधी लोक, गाई, आणि पशु, व घोडे यांना मारूं नकोस. आणि हे रुद्रा, आमच्या शूर लोकांना रागावून ठार मारूं नकोस. आम्ही हविर्भाग घेऊन तुला नेहमीं बोलावीत जाऊं. हा मंत्र म्हणून पळीनें अग्नीचें भस्म घ्यावें व पुढील मंत्र म्हणून लावावें.

कश्यपाचें तीनदां अपमृत्यूंतून संरक्षण करणारें भस्म मी कण्ठाचें ठिकाणीं धारण करितों.

तीन वेळां जमदग्नीचा अपमृत्यू टाळणारें हें भस्म मी कपाळावर धारण करितों. हें भस्म जमदग्नीप्रमाणें माझेहि अपमृत्यू टाळो.

आहुति दिल्यानंतर पूर्वीप्रमाणें तीनदां परिसमूहन आणि पर्युक्षण करावें आणि 'विश्वानि न' हा मंत्र म्हणून पूर्वीच्याच जागीं पूर्वीप्रमाणें अक्षता ठेवाव्यात. ह्या मंत्राचा अर्थ पान १० मध्यें पहा. नंतर गंध, फूल धूप, दीप, नैवेद्य, ह्या पंचोपचारांनीं अग्नीची पूजा करावी.

११ प्रार्थनाः—ॐ चं मे स्वरंश्च मे यज्ञोपं च ते नमंश्च। यत्ते न्यूनं तस्मै त उपयत्तें तिरिक्तं तस्मै ते नमः ॥अग्नये नमः॥ स्वस्ति ॥ श्रद्धां मेधां यशः प्रज्ञां विद्यां बुद्धिं श्रियं बलम् । आयुष्यं तेज आरोग्यं देहि मे हव्यवाहन ॥ प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषु यत् ॥ स्मरणादेव तद्विष्णोः संपूर्णं स्यादिति श्रुतिः ॥ अनेन प्रातःसायं वैश्वदेवांगहोमाख्येन कर्मणा भगवान्यज्ञरूपी परमेश्वरः प्रीयतां ॥ इतिदेवयज्ञः । आचमनम् प्राणायामः ।

---

अगस्त्य महर्षीला ज्या भस्मानें तीनदां अपमृत्यूंतून टाळलें तें भस्म मी नाभीचें ठिकाणीं धारण करितों.

ज्यानें देवांना तीनदां अपमृत्यूंतून तारिलें तें भस्म मी उजव्या खांद्यावर धारण करितों.

तीनदां अपमृत्यूंपासून संरक्षण करणारें तें भस्म माझ्या डाव्या खांद्याच्या ठिकाणीं असो.

( मला अपमृत्यू न यतां ) पूर्ण शंभर वर्षे आयुष्य असो, म्हणून हें भस्म मी मस्तकावर धारण करितों.

**प्रार्थनाः**—हे यज्ञपुरुषा, प्रणव उदात्तादि स्वर वगैरेमुळें जें ह्या कर्मांत वैगुण्य प्राप्त झालें असेल तेंहि तुला नमस्कार केल्यानें नाहींसें होईल आणि जें जास्त झालें असेल तेंहि तुला नमस्कार केल्यानें गुणयुक्त होईल. म्हणून तुला नमस्कार असो.

आमचें कल्याण असो. हे अग्ने, आस्तिक्य-बुद्धि, मनाचें सामर्थ्य, कीर्ति, मेंदूचें सामर्थ्य, विद्या, ज्ञान, संपत्ति, बल, दीर्घायुष्य, तेजस्वीपणा आणि आरोग्य हीं मला दे.

चुकीमुळें ह्या कर्मांत जें कांहीं चुकेल तें विष्णूच्या स्मरणानें संपूर्ण होतें असें वेदांत सांगितलें आहे. म्हणून मी विष्णूचें स्मरण करतों. ह्या सकाळ संध्याकाळच्या वैश्वदेवाला अंगभूत असणाऱ्या होमरूप कर्मानें भगवान् यज्ञरूपी परमेश्वर प्रसन्न होवो. ह्याप्रमाणें देवयज्ञ होय.

**अथ भूतयज्ञः**—( भूमिं प्रोक्ष्य मध्यभागादन्नमादाय प्राचीमारभ्य ईशानीपर्यंतं चक्राकारं नैरंतर्येण ) १ सूर्याय स्वाहा ॥ २ प्रजापतये स्वाहा ॥ ३ अग्नये स्वाहा ॥ ४ प्रजापतये स्वाहा ॥ ५ सोमाय वनस्पतये स्वाहा ॥ ६ अग्नीषोमाभ्यां स्वाहा ॥ ७ इंद्राग्निभ्यां स्वहा ॥ ८ द्यावापृथिवीभ्यां स्वाहा ॥ ९ धन्वन्तरये स्वाहा ॥ १० इंद्राय स्वाहा ॥ ११ विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥ १२ ब्रह्मणे स्वाहा ॥ १३ अद्भ्यः स्वाहा ॥ १४ ओषधिवनस्पतिभ्यः स्वाहा ॥ १५ गृहाय स्वाहा ॥ १६ गृहदेवताभ्यः स्वाहा ॥ १७ वास्तुदेवताभ्यः स्वाहा ॥ ( चक्राद्बहिः प्राच्यां प्राक्संस्थं ) १८ इंद्राय स्वाहा ॥ १९ इंद्रपुरुषेभ्यः स्वाहा ॥ ( दक्षिणत उदक्संस्थं ) २० यमाय स्वाहा ॥ २१ यमपुरुषेभ्यः स्वाहा ॥(पश्चिमतः प्राक्संस्थं ) २२ वरुणाय स्वाहा ॥ २३ वरुणपुरुषेभ्यः स्वाहा ॥

---

**भूतयज्ञ**—देवयज्ञ झाल्यावर आचमन प्राणायाम करून भूतयज्ञ करण्याकरितां भूमि प्रोक्षण करावी.

नंतर १ सूर्याय स्वाहा येथपासून १७ वास्तुदेवताभ्यः स्वाहा येथपर्यंत चक्राकार आहुति द्याव्यात, नंतर चक्राच्या बाहेर पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर दिशांस १८ इंद्राय स्वाहा येथपापासून दोन दोन आहुति द्याव्यात.

नंतर चक्राच्या मध्यभागीं २६ ब्राह्मणे स्वाहा ही आहुति देऊन तिच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर बाजूस क्रमानें एक एक आहुति द्यावी. ३० दिवाचारिभ्यः याच्या शेजारींच ३१ नक्तंचारिभ्यः ही आहुति द्यावी.

नंतर चक्राबाहेर ईशान्यी, आग्नेयी, नैर्ऋती व वायव्य या कोणदिशेस ३२ रक्षोभ्यः स्वाहा येथून आहुति द्याव्यात. आणि ३६ सनकादिमनुष्येभ्यो हन्त ही आहुति शेवटीं ईशान्य दिशेस द्यावी.

यामध्यें ३३ स्वधा पितृभ्यः, ३४ श्यामाय, ३५ शबलाय हा पितृयज्ञ होय. ३६ सनकादिमनुष्येभ्यो हन्त हा अतिथियज्ञ व बाकीचा भूतयज्ञ होय.

( उत्तरस्यामुदक्संस्थं ) २४ सोमाय स्वाहा ॥ २५ सोमपुरुषेभ्यः स्वाहा ॥ ( चक्रमध्ये ) २६ ब्रह्मणे स्वाहा ॥ ( तत्प्राच्यां ) २७ ब्रह्मपुरुषेभ्यः स्वाहा ॥ ( ब्रह्मणो दक्षिणतः ) २८ विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥ ( ब्रह्मणः पश्चिमतः ) २९ सर्वेभ्यो भूतेभ्यः स्वाहा ॥ ( ब्रह्मण उत्तरतः ) ३० दिवाचारिभ्यः स्वाहा ॥ ३१ नक्तंचारिभ्यः स्वाहा ॥ ( चक्रादुत्तरतः ) ३२ रक्षोभ्यः स्वाहा ॥ ३३ स्वधा पितृभ्यः॥ ३४ श्यामाय स्वाहा ॥(चक्राद्वायव्यकोणे)३५ शबलाय स्वाहा॥ ३६ सनकादिमनुष्येभ्यो हंत । इदं न मम ॥

**काकबलिः**—(गृहाद्बहिः ) ऐंद्रवारुणवायव्या याम्या नैर्ऋतिकाश्च ये ॥ ते काकाः प्रतिगृह्णन्तु भूम्यां पिंडं मयोज्झितम् ॥ वैवस्वतकुले जातौ द्वौ श्यामशबलौ शुनौ । ताभ्यां पिंडो मया दत्तो रक्षतां पथि मां सदा ॥ ये भूताः प्रचरंति दिवा नक्तं बलिमिच्छन्तो वितुदस्य प्रेष्ठाः । तेभ्यो बलिं पुष्टिकामो ददामि मयि पुष्टिं पुष्टिपतिर्ददातु स्वाहा ॥

---

पितृयज्ञांतील विशेष—आग्नेय दिशेला तोंड करून प्राचीनावीति करावी. आणि नंतर अन्नाच्या तिसऱ्या भागांतील आंगठ्याच्या पऱ्याएवढें अन्न घेऊन तें जलयुक्त डावा गुडघा जमीनीला टेकून 'स्वधा पितृभ्यः' असा मंत्र उच्चारून उताणा हात करावा आणि पितृतीर्थानें आहुती द्यावी. पितृतीर्थ म्हणजे आंगठा आणि आंगठ्या जवळचें बोट ह्यांमधील जागा होय

**काकबलिः**— पूर्व, पश्चिम, वायव्य, दक्षिण आणि नैर्ऋति ह्या दिशांस जे कावळे असतील त्या कावळ्यांनीं मी जमिनीवर ठेवलेला हा अन्नाचा पिंड ग्रहण करावा. वैवस्वत कुलामध्यें दोन शाम आणि शबल नांवाचे कुत्रे झाले. त्यांना मी हा पिंड दिलेला आहे. त्यांनीं माझें मार्गामध्यें नेहमीं संरक्षण करावें.

( बलिदानोत्तरमंगण एव गोदोहनमात्रं स्थित्वातिथिमाकां-क्षेत् । प्रक्षालितपाणिपाद आचम्य गृहं प्रविशन्निमं मंत्रं पठेत् ॥ )

**ॐ शांता पृथिवी शिवमंतरिक्षं द्यौर्नो दुर्व्यभयं नो अस्तु । शिवादिशः प्रदिश उद्दिशो नः आपो विद्युतः परि पांतु सर्वतः ॥ शांतिः शान्तिः शांतिः ॥ सर्वारिष्टशांतिरस्तु ।**

**इति श्रीवैश्वदेवः ।**

---

रात्रंदिवस बलीची इच्छा करणारे, आणि लोकांना त्रास देण्यामध्यें श्रेष्ठ असे जे कोणी संचार करीत असतील, त्यांना हा बलप्रद बलि मी दिला आहे. बलप्रद पुष्टिपति माझें शरीर आरोग्ययुक्त करो.

काकबलि देण्याकरितां रस्त्यावर यावें. आणि सर्व मंत्र म्हणून शेवटीं हातांत आणलेलें अन्न जमिनीवर किंवा दगडावर पाणी शिंपून त्यावर ठेवावें. नंतर कोणी अतिथि भेटल्यास त्याला घरांत आणून यथाशक्ति अन्न द्यावें.

अखिल पृथ्वी शांत असावी. आकाश कल्याणकर व्हावें. दिव्य स्वर्ग प्राप्त व्हावा आणि आम्हांला कशाचीही भीति नसावी. दिशा आणि उपदिशा यांच्यापासून आम्हांला फायदे व्हावेत. आणि विद्युल्लतेच्या योगानें शुद्ध असणारें पाणी आम्हांला नेहमीं प्राप्त होऊन त्यामुळें आम्हांला सर्व तऱ्हेचें आरोग्य प्राप्त व्हावें. सर्व प्रकारची शान्ति आम्हांला लाभावी. सर्व अरिष्टें नाहींशीं व्हावींत.

येथें वैश्वदेव संपला.

# भोजनाच्या वेळची प्रार्थना

१ ॐ भूर्भुवःस्वः । तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ।

२ ॐ प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव । यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणाम् ॥

३ एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः । त्रीन्लोकान्व्याप्य भूतात्मा भुङ्क्ते विश्वभुगव्ययः ॥ [ अनेन ब्राह्मणसुवासिनीभोजनेन श्रीपरमेश्वरः प्रीयताम् । ]

४ यन्तु नद्यो वर्षन्तु पर्जन्याः । सुपिप्पला ओषधयो भवन्तु ॥ अन्नवतामोदनवतामामिक्षवताम् । एषां राजा भूयासम् । ओदनमुद्ब्रुवते । परमेष्ठी वा एषः । यदोदनः परमामेवैनं श्रियं गमयति ।

---

१ सर्व स्थिर आणि जर जगाला उत्पन्न करणाऱ्या तेजस्वी सूर्याचें तेज जें आमच्या बुद्धीला प्रेरणा करतें, त्याचें आम्ही ध्यान करतों. २ हे लोकपाला, उत्पन्न झालेल्या या जगाचा तुझ्याशिवाय दुसरा कोणी निर्माता नाहीं. ज्या इच्छेनें तुझी आम्ही पूजा करितों त्या आमच्या इच्छा तूं पूर्ण कर. आम्ही अनेक प्रकारच्या संपत्तीचे धनी व्हावें. असें तूं आम्हांला करावेस. ) ३ भगवान विष्णु हाच स्थिर व चर( सृष्टीच्या मुळीकडचा असून त्यापासूनच वेगवेगळीं पंचमहाभूतें उत्पन्न झाल आहेत. त्रिलोक्याला व्यापून असणारा हा विश्वयोगी परमेश्वर मीं केलेले भोजन माझ्याद्वारां भक्षण करितो. ( हा संकल्प आहे. ब्राह्मण सुवासिनीला परमेश्वर प्रीत्यर्थ भोजन घातलें असतां असा संकल्प सोडण्याची पद्धत आहे. ) ४ नद्या जलपूर्ण अशा वाहोत. योग्य कालीं भरपूर पाऊस पडो. ओषधि फलपुष्पयुक्त होवोत. विविध प्रकारचीं खाद्यें, ओदन आणि दहि दूध यांचा मी धनी व्हावें. लोक ओदनाविषयीं म्हणतात कीं ओदन म्हणजे भात हा सर्व प्राण्यांना सामर्थ्य देणारा परमेष्ठी आहे. हा सुप्रसिद्ध भात उत्कृष्ट सामर्थ्य व संपत्ति हे सर्व प्राप्त करून देतो. म्हणून सर्वांनीं भोजन अत्यंत महत्त्वाचें कार्य समजलें पाहिजे.